होती. पाणिनीय कालीं कोणती पद्धत सुरू होती तें वर सांगितलें च आहे. पाणिनिकालीं वंश दोन प्रकारांनीं प्रचलित होईः––पित्याच्या नांवानें किंवा मातेच्या नांवानें, पितृवंश किंवा मातृवंश. पितृवंशानें प्रथित होणाऱ्या कुलांतील अपत्यें बापाच्या नांवा वरून आपलें नांव विशिष्ट करीत, आणि मातृवंशानें प्रथित होणाऱ्या कुलांतील अपत्यें आईच्या नांवा वरून आपलें नांव विशिष्ट करीत; जसें, वसिष्ठः–– वासिष्ठः ; पीला—पैलेयः . पैकीं मातृवंशपद्धति पाणिनीच्या च कालीं कुत्सित ऊर्फ निंद्य समजली जाऊं लागली होती, गोत्रस्त्रियः कुत्सने ण च ( ४–१–१४७ ). गार्ग्या अपत्यं गार्गो गार्गिको वा जाल्मः ॥ गार्गी या स्त्रीच्या नांवानें प्रथित होणाऱ्या मुलाला शिंदळिचा गार्ग किंवा गार्गिक असा अपशब्द योजिला जाऊं लागला होता. एकंदरींत पितृवंशपद्धति पाणिनिकालीं प्रशस्ततर समजली जात असे एवढें खरें. परंतु, मातृवंशपद्धति अगदीं च लोपली नव्हती. विद्येनें किंवा कर्मानें कमतर असे ब्राह्मण किंवा निरनिराळ्या प्रांतांत रहाणारे ब्राह्मण अद्याप स्वतंत्र जात करून राहूं लागले नव्हते.

६६ दुसरा वर्ण जो क्षत्रियांचा तो हि पाणिनीय कालीं ब्राह्मणांच्या प्रमाणें च सैल असे. क्षत्र शब्दाला घ प्रत्यय लागून क्षत्रिय व राजन् शब्दाला यत् प्रत्यय लागून राजन्य असे दोन शब्द पाणिनि सांगतो ( ४–१–१३७।१३८ ). क्षत्रिय हा सामान्यवाचक शब्द असून, राजन्य हा शब्द अभिषिक्तवंश्य क्षत्रियांचा वाचक असे. राजाच्या पुत्रांना राजपुत्र म्हणत ( ४–२–३९ ). कित्येक प्रांतांचीं व तेथील क्षत्रियांचीं नांवें एक च असत ( ४–१–१६८ ), व तेथील राजाचें हि नांव त्या जनपदवाचिक्षत्रियशब्दाला अण् प्रत्यय लागून होई. क्षत्रिय त्रिकर्माधिकारी असून, ब्राह्मणांच्या प्रमाणें च त्यांच्यांत हि दोन प्रकारचीं गोत्रें असत, ( १ ) प्रवराध्यायप्रसिद्ध गोत्रें व ( २ ) लौकिक गोत्रें. पुरोहितांचें जें प्रवराध्यायप्रसिद्धगोत्र तें च क्षत्रियाचें असे. लौकिक गोत्र ऊर्फ आडनांव पित्याच्या किंवा पूर्वजाच्या नांवा वरून पडे, उदाहरणार्थ, युधिष्ठिराः नृपतयः. युधिष्ठिर जो भारतवंशी धर्मराजा त्याच्या साहाशें वर्षें राज्य करणाऱ्या वंशजांचें हें आडनांव आहे. ह्या आडनांवा संबंधानें पाणिनि सांगतो कीं इतर तद्धित शब्दा प्रमाणें यौधिष्ठिरिः वगैरे रूपें या युधिष्ठिर शब्दा पासून होत नाहींत, तर हा शब्द तद्धितार्थी जसा चा तसा च रहातो ( २–४–६६ ). ब्राह्मणांच्या प्रमाणें च यांचीं हि लौकिक गोत्रें नाना प्रकारें साधत असत. क्षत्रियांचा एक च एक धंदा देशसंरक्षण करण्या साठीं लढण्याचा. लढतांना भारतीय क्षत्रिय मृत्यूला हि भीत नसत, ह्या करतां त्यांना नाभिः अशी संज्ञा असे. पाणिनिकालीं लढण्याचा हा धंदा क्षत्रियां खेरीज इतर अनेक आयुधजीवी

संघ करीत ( ५–३–११४ ). अशा क्षत्रियेतर आयुधजीविसंघांचीं पांचपन्नास नांवें पाणिनीनें दिलीं आहेत, उदाहरणार्थ, दामनीय, कौंडोपरथीय, पर्शु, असुर, रक्षस्, यौधेय, कौशेय, शौक्रेय, इ. इ. इ. ह्या क्षत्रियेतर लढाऊ लोकां पैकीं कित्येक चातुर्वर्ण्यबाह्य होते आणि कित्येक चातुर्वर्ण्यांतील क्षत्रियांत मोडणारे असावेत. पहिल्या वर्गाचीं उदाहरणें म्हणजे पर्शु, असुर इत्यादि; आणि दुसऱ्या वर्गाचीं उदाहरणें म्हणजे क्षौद्रक्य, मालव्य, यौधेय, दामनीय इत्यादि. ह्या आयुधजीविसंघांचे राजे हि असत. पाणिनीय कालीं क्षत्रियांची हीं अशी सामाजिक स्थिति होती.

६७ तिसरा वर्ण वैश्यांचा. यांच्या संबंधानें पाणिनीनें विशेष कांहीं लिहिलेलें नाहीं. वैश्य त्रिकर्माधिकारी असून, कृषि, पाशुपाल्य व वाणिज्य हे यांचे धंदे असत. ह्यांच्यांत हि प्रवराध्यायप्रसिद्ध गोत्रें व लौकिक गोत्रें ऊर्फ आडनावें ब्राह्मणक्षत्रियांतल्या प्रमाणें च असत. ब्राह्मणक्षात्रियांत व वैश्यांत भेद असा कीं ब्राह्मणक्षत्रियांना आर्य ही संज्ञा असे व वैश्यांना वैशेष्यें करून अर्य म्हणत ( ३–१–१०३ ). ह्या तीन वर्णांतील लोकांना समवायानें त्रैवर्णिक ही संज्ञा असे. या तिघांना उपनयनादि सर्व संस्कार असून, यांचें शिक्षण गुरुगृहीं आचार्यद्वारा होत असे ( ८–२–८३ ).

६८ चवथा वर्ण शूद्रांचा. पाणिनीला दोन प्रकारचे शूद्र माहीत होते, ( १ ) अनिरवसित शूद्र व ( २ ) निरवसित शूद्र ( २–४–१० ). अवसित म्हणजे आंत येण्याचे बंद केलेले. निरवसित म्हणजे आंत येण्याचे निःशेष बंद केलेले. अनिरवसित म्हणजे आंत येण्याचे निःशेष बंद न केलेले, अंशतः बंद केलेले. पतंजलि निरवसित या शब्दाचा अर्थ बहिष्कृत म्हणून देतो. बाहेर घालवून देण्याच्या क्रिये पेक्षां आंत येऊं देण्याचें थांबविण्याची क्रिया अवसो या धातूनें दाखविली जाते. प्रथम आंत जे असतील त्यांना नंतर बाहेर घालवून देणें शक्य असतें. शूद्र हे प्रथम आर्यसमाजांत होते अशी पतंजलीची समजूत होती. परंतु खरा प्रकार तसा नव्हता. अनार्य जे शूद्र ते पहिल्या पासून चातुर्वर्ण्यांत नव्हते––ते त्रैवर्ण्याच्या बाहेर होते. नंतर जास्ती संघट्टन झाल्या वर त्यांना अंशतः आंत घेतले. या अंशतः आंत घेण्याच्या क्रियेला अनुलक्षून पाणिनीनें अनिरवसित हें पद सूत्रांत घातलें आहे. पाणिनीच्या कालीं कांहीं शूद्रांना अंशतः समाजांत घेतलें होतें. असे अनिरवसित म्हणजे निःशेष किंवा पूर्णपणें बंदी नसलेले शूद्र म्हटले म्हणजे तक्षन्, अयस्कार, रजक. तंतुवाय, इत्यादि समाजाच्या कमजास्त उपयोगी पडणारे शूद्र होत. न उपयोगी पडणारे असे जे शूद्र होते त्यांत चंडाल, निषाद, मृतप, इत्यादि लोक येत. अभीरांना महाशूद्र म्हणत.

अनिरवसित व निरवसित या दोन्हीं शूद्रांना षट्कर्मां पैकीं कोणता च अधिकार नसे. अनिरवसित म्हणजे बंदी न केलेल्या शूद्रांनीं बनविलेल्या लांकडाच्या पेट्या, लोखंडीं भांडीं, रंगविलेलीं कापडें व विणकरीचीं वस्त्रें, स्पृश्य मानीत. बंदी केलेल्या चंडालादि शूद्रांचा साक्षात् स्पर्श गर्ह्य मानीत.

६९ चार वर्णांच्या सामाजिक स्थितींत मनुष्य या नात्यानें स्त्रियांची हि सामाजिक स्थिति अंतर्भूत होते. तत्रापि, वैशिष्ट्या करितां, स्त्रियांच्या सामाजिक स्थितीचा तपशील देतों. स्त्रिया विवाह करीत किंवा क्वचित् कुमारी म्हणजे अविवाहित हि रहात ( २–१–७० ). विवाहा पूर्वी कुमारींना मुलें झाल्यास तीं चालत, फक्त त्या मुलांना कानीन हें विशेषण देत. अर्थात् स्त्रियांचीं लग्नें बरींच उशिरा होत हें उघड झालें. कौमारावस्थेंत कानीन संतति झाल्यास ती ज्या अर्थी खपत असे, त्या अर्थी पहिला नवरा वारल्यास किंवा कोणत्या हि कारणानें पतित्वास पारखा झाल्यास, दुसरा नवरा करण्यास म्हणजे पुनर्विवाह करण्यास समाजाची आडकाठी नसे ( ४–२–१३ ). पूर्वपति जिला नव्हता तिच्या नवऱ्याला कौमार पति म्हणत व तिला स्वतःला कुमारी भार्या म्हणत. देशांत सपत्नीकत्वाची जशी चाल होती ( ४–१–३५ ), तशी च एका च कालीं अनेक नवरे करण्याची चाल हि क्वचित् प्रचलित होती, हें द्वैमित्रिः, म्हणजे दोन मित्रांचा मुलगा, या शब्दा वरून स्पष्ट दिसतें. शूद्र वर्णांतील स्त्रीला इतर वर्ण भार्या करीत ( ६–३–४१ ), हें शूद्राभार्यः या रूपा वरून स्पष्ट आहे. क्षत्रिय व वैश्य ब्राह्मणस्त्रीला हि भार्या करीत हें हि ब्राह्मणीभार्यः या रूपा वरून स्पष्ट आहे. परंतु, या वर्णबाह्य भार्यांना पत्नी हें सन्मान्य पद मिळत नसे. पत्नी म्हणजे पतीची जी सहधर्मचारिणी ( ४–१–३३ ) तिला यज्ञकर्मांत पतीच्या बरोबरीनें सहाधिकार असे. गार्हपत्य अग्नीचें स्थान जें गृह त्याची मालकी पती इतकी च सहधर्मचारिणी पत्नीची असे; सबब, गृहपति या शब्दानें पतीच्या प्रमाणें च पत्नीचा हि बोध होई. लिंगवैशिष्ट्य दर्शवावयाचें असल्यास गृहपत्नी असें रूप योजीत. क्षेत्र, गाई, इत्यादींची मालकी म्हणजे स्वतंत्र स्वामित्व स्त्रियांचें असूं शके. स्वतंत्र म्हणजे पतिनिरपेक्ष. कारण, कांहीं कुलांत पति जसा प्रधान मालक असे, त्या प्रमाणें च कांहीं कुलांत पत्नी प्रधान मालक असे. म्हणजे वंश दोन प्रकारानें उत्पन्न होई. पित्याच्या नांवानें जो वंश चाले तो पितृवंश व मातेच्या नांवानें जो वंश चाले तो मातृवंश. जेथें मातृवंश चाले त्या गृहांत गृहपतित्व म्हणजे गृहाचें स्वामित्व सहज च स्त्री कडे म्हणजे पत्नी कडे म्हणजे माते कडे येई. अर्थात्, गार्हपत्याग्नीचें रक्षण पुरुषां प्रमाणें स्त्रिया हि करीत. मातृवंशीय घराण्यांतील प्रधान स्त्री लौकिक गोत्राची प्रवर्तक होई. परंतु, पाणि-

निकालीं अश्या स्त्रीच्या अपत्याची कुत्सना म्हणजे निर्भर्त्सना होत असे ( ४–१–१४७ ). स्त्रियांना युवसंज्ञा नसे, कारण, विवाहानें त्या परगोत्रांत जात. पाणिनिकालीं जश्या कुलटा म्हणजे चवचाल स्त्रिया होत्या, तश्या पण्यस्त्रिया ऊर्फ वारस्त्रिया हि होत्या. पाणिनिकालीं कित्येक स्त्रिया आचार्यांचें म्हणजे अध्यापकाचें काम करीत. परंतु, ब्राह्मणस्त्रियांची विशेष प्रसिद्धि अन्न तयार करण्याच्या पटाईतपणा बद्दल असे. कित्येक पराक्रमी स्त्रिया मणाचा, कित्येक खंडीचा, कित्येक गाडाभरतांदुळाचा भात काढीत, त्या वरून पात्रीणा, आढकिकी, प्रास्थिकी, आचितीना इत्यादि शब्द प्रचलित झाले होते. क्षत्रियस्त्रियांना वीरपत्नी व असूर्यंपश्या हीं विशेषणें पाणिनीयांत लाविलेलीं आहेत, त्या वरून दिसतें कीं क्षत्रियस्त्रिया थोड्याफार पडदानशीन असत. इतर स्त्रियांचे व्यवहार अप्रतिबद्ध असत. आर्यकृती व ब्राह्मणकृतेयी या शब्दां वरून दिसतें कीं कित्येक अनार्य व अब्राह्मण स्त्रीपुरुषांना आर्य व ब्राह्मण करून घेण्याची चाल पाणिनीय कालाच्या पूर्वी कधीं तरी अस्तित्वांत असावी. धर्मच्युत जे वृषल त्यांच्या स्त्रियांना वृषलपति किंवा वृषलपत्नी अशी संज्ञा असे. यद्यपि कित्येक बाबतींत स्त्रियांना पुरुषांच्या बराबरीनें मान असे, तत्रापि एकंदरींत स्त्रियांचा पक्ष गौण व अध्याहरणीय लेखीत. एकशेषप्रक्रियेंत पाणिनि सांगतो कीं, स्त्रिया सहोक्तौ पुमान् शिष्यते ( १–२–६७ ). भ्रातरौ मध्यें बहिणी अध्याहृत धरीत. पुत्रौ मध्यें मुलगा व मुलगी ह्या दोहोंचा समावेश होई. बहिण व मुलगी, यांच्या हून आईला व सासूला किंचित् जास्त मान मिळे. सर्वसाधारण संक्षेपानें उल्लेख करावयाचा असला म्हणजे मातापित्यांचा दोघांचा हि निर्देश पितरौ या एका शब्दानें होई. आईची जी गत ती च सासूची. श्वशुरौ म्हणून सासऱ्या बरोबर सासूची हि वासलात लावीत. तत्रापि विशेष निर्देश करावयाचा असल्यास मातापितरौ, मातरपितरौ, श्वश्रूश्वशुरौ असा खुलासा करीत. तात्पर्य, स्त्रियांची पायरी पुरुषांच्या पायरी हून कमतर लेखीत यांत संशय नाहीं. तत्रापि वयाला कांहीं मान देत. युवा व वृद्ध स्त्री या संबंधीं समासानें बोलावयाचें असल्यास, वृद्धस्त्रीच्या पोटीं युवा गणीत.

७० ह्या पाणिनीय समाजस्थितींत एक बाब उत्कटत्वानें भासमान होत्ये. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, अनिरवसित शूद्र व निरवसित शूद्र या च्यारी वर्णां संबंधानें पाणिनि कांहीं ना कांहीं तरी सांगतो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे वर्ण एकमेकांत गौण शरीरसंबंध करीत, हें हि तो लिहितो. परंतु या गौण शरीरसंबंधा पासून जी प्रजा होई तिच्या संबंधानें किंवा तिच्या नांवा संबंधानें चकार शब्द हि काढीत नाहीं. अंबष्ठ, करण, उग्र, मागध, माहिष्य, क्षत्तृ, वैदेहक,

रथकार, निषाद, पारशव, चंडाल इत्यादि अनुलोमप्रतिलोमसंकर जे याज्ञवल्क्यानें आपल्या स्मृतींत वर्णिलेले आहेत किंवा नट, करण, झल्ल, मल्ल, निच्छिवि, खस, द्रविड, इत्यादि व्रात्य जे मनूनें सांगितलेलें आहेत त्यांचा बिलकुल उल्लेख पाणिनीयांत नाहीं. अंबष्ठ, करण, मागध, माहिष्य, क्षत्तृ, वैदेहक, निषाद इत्यादि शद्बांच्या साधनिका अष्टाध्यायींत आलेल्या आहेत. परंतु त्या पैकीं एका हि शब्दाचा अर्थ संकरजाति किंवा संकरव्यक्ति नाहीं. उदाहरणार्थ ८ – ३ – ९७ या सूत्रांत अंबा + स्थ = अंबष्ठ अशी अंबष्ठ शब्दाची साधनिका देऊन त्या पासून ४ – १ – १७१ या सूत्रानें आंबष्ठ्यः हा ताद्धितशब्द पाणिनि साधतो, परंतु तो ताद्धित किंवा मूळ अंबष्ठ शब्द संकरवाची आहे असें सांगत नाहीं, आंबष्ठ्य शब्द अपत्यवाचक व अंबष्ठ शब्द देशवाचक आहे असें सांगतो. मगध शब्दापासून मागध हा अपत्यवाचक शब्द पाणिनि देतो ( ४ – १ – १७० ) व तो तद्राजार्थक आहे हें हि सांगतो, परंतु संकरजातिवाचक तो शब्द आहे असें बोलत नाहीं. धूमादिगणांत विदेह शब्द आहे, त्याला वुञ् प्रत्यय लागून वैदेहक हा ताद्धित होतो, परंतु त्याचा अर्थ संकरजाति नाहीं ( ४ – २ – १२७ ). क्षत्तृ शब्द ६ – ४ – ११ या सूत्रांत पठित आहे, परंतु त्याचा अर्थ सारथि एवढाच आहे, संकरजाति नाहीं. महिष्या धर्म्यं माहिषं, महिष्यां साधु माहिष्यं, माहिषिक इत्यादि तद्धित पाणिनि नमूद करतो, परंतु क्षत्रिया पासून वैश्येच्या ठाईं झालेल्या संकराचें नांव माहिष्य आहे हें तो नमूद करीत नाहीं. ह्या संकरजाति जर पाणिनीला माहीत असत्या, तर हे शब्द संकरजातिवाचक आहेत हें सांगितल्या वांचून तो रहाता ना. पाणिनि पराकाष्ठेचा आस्थेवाईक वैयाकरण आहे. भाषेच्या बारीकसारीक लकबा देखील तो सांगण्याच्या विसरत नाहीं. असें असतांना, ज्या अर्थी क्षत्तृ, मागध, करण, वैदेहक, माहिष्य, अंबष्ठ, इत्यादि शब्द संकरजातिवाचक आहेत हें तो सांगत नाहीं, त्या अर्थी एक च अनुमान या अनुपलब्धी पासून काढणें शक्य आहे कीं पाणिनीच्या काळीं संकरजाति हा सामाजिक वर्ग स्वतंत्रपणें आस्तित्वांत आलेला नव्हता. पाणिनिकालीं वस्तुस्थीत च अशी होती कीं ब्राह्मणा पासून शूद्रीच्या, क्षत्रियीच्या किंवा अर्यीच्या ठाईं झालेल्या संततीला निंद्य समजत नसत, गौण समजत इतकें च. पाणिनिपूर्वकालीं म्हणजे आर्षकालीं तर ब्राह्मण व शूद्री यांच्या पासून झालेल्या संततीला, निंद्य तर राहूं द्या च पण गौण हि समजत नसून, पूर्ण ब्राह्मण समजत. आर्षकाल व पाणिनिकाल यांत एतत्संबंधानें भेद एवढा च कीं, पाणिनिकालीं वर्णावर्णांतील शरीरसंबंध फक्त गौण समजला जाऊं लागला होता. पाणिनीच्या नंतर वर्णबाह्य शरीरसंबंध केव्हां निंद्य समजला जाऊं लागला त्या

विषयीं उल्लेख पुढें यथास्थलीं येईल. संकरां संबधानें जसा उल्लेख पाणिनीयांत नाहीं, तसा च मनूनें वर्णिलेल्या नट, करण, झल्ल, मल्ल, निाच्छवि, खस, द्रविड, वगैरे व्रात्यां संबधानें हि व्रात्य म्हणून उल्लेख त्यांत बिलकुल नाहीं.

७१ असा हा पाणिनिकालीन समाज होता. ह्या समाजाचे भाषेच्या दृष्टीनें दोन भाग, ( १ ) त्रैवर्णिकाचा पहिला आणि ( २ ) शूद्रांचा दुसरा. पाणिनीनें ज्या भाषेचें व्याकरण दिलें आहे ती भाषा त्रैवर्णीक बोलत. तिला आपण पाणिनीय संस्कृत भाषा म्हणूं. बंदी न केलेल्या शूद्रांना ही संस्कृत भाषा कळे, परंतु बोलतांना तिचा ते अस्पष्ट उच्चार करीत. ह्या अस्पष्ट बोलण्याला पाणिनीयांत म्लिष्ट असा शब्द आहे. हा शब्द, म्लेच्छ अस्पष्टे शब्दे, धातू पासून निघाला आहे. अस्पष्ट उच्चार करणाऱ्या सर्व लोकांना म्लेच्छ शब्द त्या कालीं लावीत. न ब्राह्मणेन म्लेच्छितवै असें एक छांदस वाक्य आहे. तें ब्राह्मणांना अनुलक्षून विशेषतः असल्या मुळें, असा तर्क करतां येतो कीं, क्षत्रियांनीं किंवा वैश्यांनीं — शूद्रांची तर गोष्ट च नको — अस्पष्ट बोललें असतां चाले. म्हणजे क्षत्रिय व वैश्य त्या कालीं अस्पष्ट उच्चार करितांना ऐकूं येत असत हें उघड झालें. एकटी ब्राह्मण जात तेवढी स्पष्ट उच्चार करी व शुद्ध पाणिनीय संस्कृत भाषा बोले. क्षत्रिय व वैश्य थोडेफार अस्पष्ट उच्चार करीत व कमजास्त अशुद्ध भाषा बोलत. शूद्र तर बोलूनचालून च अस्पष्ट अशुद्ध बोलत. पैकीं पाणिनीय कालीं शुद्रांची विशेष म्हणजे मुळीं च मातब्बरी नव्हती. त्यांना संस्कार नव्हते, धर्म नव्हते, ते केवळ उच्च प्रकारचे उपयोगी पशू गणले जात. आणि वस्तुस्थिति हि त्या पैकीं च होती. अमनुष्यकर्तृके च ( ३—२—५३ ) या सूत्राच्या व्याख्यानांत शूद्राचें एक परंपरागत विशेषण दिलें आहे त्या वरून शूद्रांच्या तत्कालीन रानटी स्थिती वर लख्ख उजेड पडतो. तें विशेषण आखुघात हें होय. शूद्र म्हणजे कोण आणि कसा ओळखावा? तर आखुघातः शूद्रः। आखुघात हा शूद्राचा त्या कालीं पर्यायशब्द च होता. उंदीर मारणारा व अर्थात् ते खाणारा जो तो शूद्र. सध्यां हि वडार ( पाणिनिकालीन वध्र ) वगैरे जातींचें उंदीर हें मोठें प्रिय खाद्य आहे. पाणिनिकालीं तें साऱ्या शूद्रांचें खाद्य होतें. तात्पर्य, पाणिनिकालीन शूद्र अगदीं निकृष्ट संस्कृतीचे लोक होते. हे च आर्यांना भरतखंडांत प्रथम भेटलेले एतद्देशीय रानटी लोक होत. हे लोक पाणिनिकालीं, यूरोपीयन समाजशास्त्रीय परिभाषेंत बोलावयाचें म्हणजे, नुकते च कोठें लोहयुगांत प्रवेश करण्याच्या तयारींत होते. यांच्यांत कांहीं जाति ओबडधोबड प्राथमिक शिल्पकाम करणाऱ्या होत्या. कित्येक बांबू, वेली, इत्या-

दींचें बुरुडकाम करीत, त्यांना वरुड ही संज्ञा होती. कित्येक वनफळें चेंचून त्यांनीं वस्त्रें रंगवीत, त्यांना रजक म्हणत. कित्येक डोंगरांत खड्डे काढून त्यांतून तांबें व लोखंड तयार करीत, त्यांना ताम्रकुट्ट व अयस्कार म्हणत. असे प्राथमिक शिल्पें करणारे कांहीं शूद्र होते. त्यांचे स्वभावसिद्ध धंदे करण्यास आर्यांनीं त्यांना स्वतःच्या ग्रामांत जागा दिल्या व कालान्तरानें त्यांना त्रैवर्णिकांच्या जोडीस घेऊन त्यांच्या सुद्धां सर्वतः प्रसिद्ध जें अपूर्व चातुर्वर्ण्य तें निर्माण केलें. सहज माणसाळण्या सारखे जे शूद्र नव्हते त्यांना त्यांच्या अरण्यांत आर्यग्रामा बाहेर स्वतंत्र राहूं दिलें. माणसाळलेले जे धंदे करणारे कारु अथवा कारि ते च अष्टाध्यायींतील अनिरवसित शूद्र होत. ह्यांच्या पूर्व भाषा काय असतील त्या असोत, त्यांचा आतां पाणिनिकालीं मागमूस हि राहिला नसावा. ते म्लिष्ट अशी संस्कृत भाषा बोबड्यानें बोलत व त्रैवर्णिकांची संस्कृत समजत. एणें प्रमाणें पाणिनिकालीं ब्राह्मणांत शुद्ध संस्कृत भाषा, क्षत्रियवैश्यांत अस्पष्ट व गांवढी भाषा, व माणसाळलेल्या शूद्रांत बोबडी चाली पुरती चालचलाऊ बोली, असे भाषेचे तीन प्रकार रूढ होते. पैकीं अत्यंत उच्च प्रतिष्ठितपणा एका ब्राह्मणांच्या भाषेला तेवढा आलेला होता. क्षत्रियवैश्यांची अस्पष्ट बोली अद्याप स्वतंत्र भाषेच्या तोलाची बनली नव्हती आणि शूद्रांच्या बोबड्या बोलींचें नांव हि घेण्या सारखें नव्हतें. उघड च आहे कीं प्राकृत म्हणून ज्या भाषेला पुढें म्हणूं लागले, ती बोली ह्या कालीं मुळांत च गौण व ग्राम्य रूपांत असल्या मुळें, तिचें नांव हि अष्टाध्यायींत नाहीं. मिश्र शरीरसंबंध समाजांत चालू असतां, तो प्रतिष्ठितपणें व स्वतंत्रपणें संकर म्हणून ओळखण्याची आवश्यकता ज्या प्रमाणें पाणिनीय कालीं समाजाला भासली नव्हती, त्या प्रमाणें च अस्पष्ट व गांवढे उच्चार समाजांत चालू असतां, त्यांना प्रतिष्ठितपणें व स्वतंत्रपणें प्राकृत म्हणून ओळखण्याची आवश्यकता त्या कालीं भासली नाहीं.

७२ एणें प्रमाणें पाणिनीच्या वेळेस ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची सामाजिक स्थिति काय होती व यांची भाषा कोणती होती हें सांगितलें. आतां या दोन बाबींत गेल्या अडीच तीन हजार वर्षांत म्हणजे पाणिनीच्या नंतरच्या काळांत कोणकोणते फरक होत गेले ते सांगावयाचे. एथ पर्यंत दिलेल्या तपासिलांत आपणाला असें समजून आलें कीं, ब्राह्मणक्षत्रियवैश्यांचें त्रैवर्ण्य गुण्यागोविंदानें नांदत असून तें संस्कृत भाषा बोलत आहे आणि शूद्रवर्ण आर्यभाषा व आर्यसंस्कृति अत्यन्त मंदपणानें शिकत असून त्याला त्रैवर्णिकांच्या बरोबरीचें व्हावयाला अद्याप पुष्कळ अवकाश आहे. पाणि-

नंच्या नंतरच्या काळांत ह्या स्थितींत कोणकोणते फरक कोणत्या कोणत्या कारणांनीं झाले तें आतां नमूद करतों.

७३ प्रत्याभिवादेऽशूद्रे ( ८–२–८३ ) असें पाणिनीय सूत्र आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या सर्वांचा गुरु ब्राह्मण. गुरु भेटले असतां, त्यांना अभिवादन करावयाची चाल पाणिनिकालीं असे. शिष्यानें अभिवादन केलें म्हणजे गुरु उलट प्रत्यभिवादन करीत. ह्या प्रत्यभिवादना संबंधानें पाणिनि सांगतो कीं प्रत्यभिवादन करितांना गुरूनें जें वाक्य उच्चारावयाचें त्या वाक्यांतलि अंत्य स्वर, अभिवादक जर ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य या त्रैवर्णिकां पैकीं स्त्रीपुरुष कोणी असेल तर, प्लुत उच्चारावा आणि अभिवादक जर शूद्रांपैकीं स्त्रीपुरुष असेल तर प्रत्यभिवादवाक्यांतील अंत्य स्वर प्लुत उच्चारूं नये. उदाहरणार्थ, गुरु भेटले असतां कोणी ब्राह्मणशिष्य म्हणतो, अभिवादये देवदत्तोऽहम्. त्याला गुरु प्रत्यभिवादन करतात कीं, भोः आयुष्मान् एधि देवदत्ता. अभिवादन करणारी ब्राह्मणस्त्री असेल तर ती, अभिवादये गार्गी अहं, असें म्हणे व गुरु तिचें प्रत्यभिवादन, भोः आयुष्मती एधि गार्गी, असें करीत. हा च न्याय क्षत्रिय स्त्रीपुरुषांना लागू असे. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य अश्या स्त्रीपुरुष अभिवादकांचा तक्ता च देतों, म्हणजे पाणिनिकालीं अभिवादप्रत्यभिवाद कसा करीत तें थोडक्यांत लक्ष्यांत येईल.

| १<br>अभिवादक शिष्य | २<br>प्रत्याभिवादक गुरु |
|---|---|
| ब्राह्मणपुरुषः—अभिवादये देवदत्तोऽहम् | भोः आयुष्मान् एधि देवदत्ता ३ |
| ब्राह्मणस्त्रीः–अभिवादये गार्गी अहम् | भोः आयुष्मती भव गार्गी ३ |
| क्षत्रियपुरुषः—अभिवादये युधिष्ठिरोऽहम् | भोः आयुष्मान् एधि युधिष्ठिरा ३ |
| क्षत्रियस्त्रीः–अभिवादये अनसूयाऽहम् | भोः आयुष्मती भव अनसूया ३ इ |
| वैश्यपुरुषः–अभिवादये इंद्रगुप्तोऽहम् | भोः आयुष्मान् भव इंद्रगुप्ता ३ |
| वैश्यस्त्रीः—अभिवादये गोपालिताऽहम् | भोः आयुष्मती एधि गोपालिता ३ इ |

परंतु अभिवादक जर शूद्र स्त्री किंवा पुरुष असेल तर प्रयोग असा होई.

| | |
|---|---|
| शूद्रपुरुषः—अभिवादये तुषजकोऽहम् | कुशल्यासि तुषजक |
| शूद्रस्त्रीः—अभिवादये तुषजिकाऽहम् | कुशलिन्यसि तुषजिके |

ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य स्त्रीपुरुषांच्या नांवांतील अन्त्य स्वर जे अ, इ, ए, ते प्रत्याभिवादक गुरु आ, ई, आ ३ इ असे प्लुत उच्चारीत. परंतु, शूद्र स्त्रीपुरुषांच्या नांवांतील अन्त्य अ किंवा ए प्लुत न उच्चारतां फक्त एकेरी तुटका उच्चारीत. एथें प्रश्न असा येतो कीं, त्रैवर्णिकांच्या नांवाचा उच्चार

प्लुत कां आणि शूद्रांच्या नांवाचा उच्चार प्लुत कां नाहीं? या प्रश्नाला उत्तर असें आहे कीं, गुरूला त्रैवर्णिकां संबंधानें जो आपलेपणा व जी माया वाटे तो आपलेपणा व ती माया शूद्रां संबंधानें पाणिनिकालीं वाटत नसे. सध्यां आपण हि असें च करतों. माया दाखवावयाची असली म्हणजे विशेषनामांचा अन्त्य स्वर प्लुत उच्चारतों व माया न दाखवितां तुटकपणा दाखवावयाचा असला म्हणजे विशेषनामांचा अन्त्य स्वर तुटक व आखुडता उच्चारतों. रामाआआ! ये हो! हे प्लुत उच्चार करण्यांत व राम्या! निघ जा! हे आखुडते उच्चार करून, आपण काय दर्शवितों. प्लुत उच्चार करून आपला पुत्र जो राम तद्विषयक आपलेपणा आपण दाखवितों आणि आखुडता उच्चार करून घरचा गडी जो राम्या तद्विषयक अनादर व हुकमत दाखवितों. तो च प्रकार पाणिनिकालीं हि विद्यमान होता. त्रैवर्णिक आपले आहेत, सबब त्यांना आदर दाखवीत; शूद्र आपले नव्हत, हुकमी आहेत असें वाटे, सबब त्यांचा अनादर होई. अशी स्थिति पाणिनिकालीं होती. आतां पाणिनिनंतर पांचसहाशें वर्षांनीं झालेला जो कात्यायन तो काय सांगतो तें पहा. पाणिनिकालीं त्रैवर्णिक जसे पुरुष तश्या त्रैवर्णिक स्त्रिया हि मायेचा व आपलेपणाचा विषय असल्या मुळें, त्यांच्या नांवांतील अन्त्य स्वर मायेनें प्लुत उच्चारीत. कात्यायनकालीं हा प्रघात बंद पडला. कात्यायन लिहितो, स्त्रियां न; स्त्रियांच्या नांवांतील अंत्य स्वर प्लुत उच्चारूं नये, तुटक व आखुडता उच्चारावा. तसें च, या सूत्रा वर कात्यायन दुसरें एक वार्तिक लिहितो; राजन्यविशां वेति वाच्यं. क्षत्रिय आणि वैश्य यांच्या नांवांतील अन्त्य स्वराचा उच्चार विकल्पें करून प्लुत करावा किंवा न करावा. या विकल्पाचा अर्थ असा होतो कीं क्षत्रिय आणि वैश्य यांना माया व आपलेपणा प्रसंगीं दाखवावा किंवा प्रसंगीं न हि दाखवावा. एका च मनुष्याची अशी दोन तऱ्हेनें प्रत्यभिवादना करावी असा सांगण्याचा कात्यायनाचा आशय नाहीं. तर क्षत्रियां क्षत्रियांत व वैश्यां वैश्यांत तारतम्य पाहून प्लुत किंवा अप्लुत संभावना करावी. तात्पर्य, पाणिनीच्या वेळेस एकटी शूद्रजात तेवढी मायेंतून वगळली जात असे; कात्यायनकाळीं शूद्रांना तर वगळीत च, परंतु त्यांच्या बरोबर चार हि वर्णांच्या दरोबस्त स्त्रियांना आणि क्षत्रिय व वैश्य यांतील कांहीं व्यक्तींना मायेंतून ब्राह्मणांनीं कमी केलें होतें. सर्व स्त्रिया, कांहीं क्षेत्रियवैश्य व सर्व शूद्र एवढ्यांना च कात्यायनकालीं ब्राह्मणांनीं मायेंतून कमी केलें होतें असें नव्हे, तर कात्यायनाच्या नंतर दोनशें वर्षांनीं झालेल्या पतंजलीच्या कालीं ब्राह्मणां हि पैकीं कांहीं लोक ब्राह्मणांच्या मर्जींतून उतरले होते. अशूद्रस्त्र्यसूयकेषु, असें पतंजली नमूद करतो. असूयक म्हणजे ब्राह्मणधर्माचा मत्सर करणारा असा जो कोणी व्यक्ति

असेल, मग तो ब्राह्मण असो कीं कोणी असो, त्याचा धर्मशील ब्राह्मण धिक्कार करीत. असूयकस्त्वमसि जाल्म, न त्वं प्रत्यभिवादमर्हसि, धर्माची अवहेलना करणारा वृषल आहेस, जळो तुझें तोंड, प्रत्यभिवादनास तूं अपात्र आहेस, असे पतंजलीचे शब्द आहेत. तात्पर्य, सर्व स्त्रिया, सर्व शूद्र, कांहीं क्षत्रियवैश्य आणि सर्व असूयक, यांच्या वरील माया धर्मशील ब्राह्मणांनीं कमी केली होती. अशी ही इतकी माया कमी करण्याचें कारण काय? पाणिनि व कात्यायनपतंजलि ह्यांच्या दरम्यान्च्या काळांत स्त्रियांच्या, क्षत्रियांच्या, वैश्यांच्या, व ब्राह्मणांच्या सामाजिक स्थितींत असे कोणते भयंकर फेरफार व बदल झाले होते कीं हे सर्व लोक ब्राह्मणांच्या मायेस अश्या विलक्षण तऱ्हेनें पारखे व्हावे? प्रश्न अत्यन्त महत्त्वाचा आहे, इतक्या पराकाष्ठेच्या महत्त्वाचा कीं त्याचा साद्यन्त उलगडा करणें परम अगत्याचें भासतें.

७४ पाणिनि शकपूर्व १००० च्या सुमारास होऊन गेला आणि कात्यायन त्याच्या नंतर सुमारें सहाशें वर्षांनीं व पतंजलि आठशें वर्षांनीं होऊन गेले. शकपूर्व १००० पासून शकपूर्व २०० पर्यंतच्या आठशें वर्षांत ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र यांच्या सामाजिक स्थितींत जे ठळकठळक फेरफार होऊन गेले व ज्यांच्या मुळें धर्मशील ब्राह्मण सर्व शूद्र, सर्व स्त्रिया, सर्व असूयक, आणि कांहीं क्षत्रिय व कांहीं वैश्य यांना तिरस्कारानें वागवूं लागले, त्या फेरफारांचें वर्णन मुख्यतः स्मृतिग्रंथांच्या व इतिहासाच्या आधारानें करितों. पैकीं, प्रथम असूयकांना वाटेस लावूं. लोकायतिक, बौद्ध, जैन, इत्यादि सनातनधर्मद्वेष्ट्यांचा उदय पाणिनि व कात्यायन ह्यांच्या कालांच्या दरम्यान् झाला व त्या उदयाची परमसीमा पतंजलीच्या कालीं झाली. पाणिनिकालीं बौद्ध, जैन वगैरे पाखंडी लोक मुळीं अस्तित्वांत च नसल्यामुळें, त्यांच्या प्रत्यभिवादना संबंधानें अष्टाध्यायींत बिलकुल उल्लेख नसावा हें साहजिक आहे. कात्यायनकालीं व पतंजलिकालीं बौद्ध, जैन वगैरे असूयक म्हणजे सनातनधर्मद्वेष्ट्या लोकांचा समाजांत पराकाष्ठेचा सुळसुळाट झाला, अर्थात् धर्मशील ब्राह्मण त्यांना प्रत्यभिवादन करीत नसत व त्यांच्या अभिवादनाला विशेष किंमत देत नसत. बौद्ध व जैन हे ब्राह्मणांचें गुरुत्व मानीत नसत व ब्राह्मण त्यांना आपल्या शिष्यवर्गांत गणीत नसल्या मुळें, त्यांना प्रत्यभिवादन करण्यास शिष्टाचारानें बांधले गेले नसत. पाणिनिकालीं सर्व चातुर्वर्णिक समाज ब्राह्मणांचा अनुयायी होता. पतंजलिकालीं समाजांतील बरा च मोठा भाग चातुर्वर्ण्य सोडून बुद्ध व जिन यांचा अनुयायी बनला होता. असूयकांशीं दूरीभाव ब्राह्मणांनीं काय कारणांनीं धरिला त्याची हकीकत ही अशी अगदीं स्पष्ट व उत्तान आहे.

७५ क्षत्रिय व वैश्य यांच्या पैकीं कांहींशीं ब्राह्मणांनीं जो दूरीभाव स्वीका-

रिला त्यांचीं कारणें वरच्यांच्या हून किंचित् निराळीं आहेत. पाणिनिकालीं सर्व क्षत्रिय व वैश्य सनातनधर्माचरणी होते. कात्यायनपतंजलिकालीं ह्या क्षत्रियवैश्यां पैकीं कांहींत यज्ञादि वैदिक क्रियांचा लोप होऊन ते केवळ वृषल म्हणजे शूद्रसम बनले. असे जे लुप्तक्रिय क्षत्रियवैश्य होते ते यद्यपि दिसण्यांत क्षत्रियवैश्यां सारखे दिसत, तत्रापि क्रियाच्युत झाल्या मुळें, ब्राह्मणांच्या आदरास अपात्र ठरले. चंद्रगुप्त मौर्य एवढा पराक्रमी कीं त्यानें विस्तीर्ण साम्राज्य स्थापन केलें, परंतु त्याला कौटिल्य क्रियालोपास्तव, रे वृषल!, म्हणून संबोधी. जे वैश्यक्षत्रिय बुद्धजिनाद्यनुयायी बनले होते त्यांच्यांत व ह्या वृषलांत अंतर एवढें च कीं ते सपशेल धर्मच्युत होऊन गेले होते व हे फक्त लुप्तकर्म बनले होते म्हणजे शूद्रसम झाले होते. अश्या शूद्रसम वृषलप्राय वैश्या क्षत्रियांचें प्रत्यभिवादन करणें धर्मशील ब्राह्मणांना अनन्वित वाटूं लागलें. जे वैश्यक्षत्रिय सनातनक्रियांचें आचरण करीत त्यांचें प्रत्यभिवादन ब्राह्मण आनंदानें करीत; परंतु, ज्यांच्यांत यज्ञोपयनयनादि क्रियांचा लोप झाला होता त्यांचा प्रत्यभिवाद करणें ब्राह्मणांना अधर्म्य भासे. हे लुप्तक्रिय वैश्यक्षत्रिय सनातनधर्माच्या व बौद्धजैनादि पाखंडांच्या सीमाप्रदेशा वर असत. प्रसंग पडेल त्या प्रमाणें कधीं सनातनधर्मा कडे झुकत व कधीं पाखंडांचा पुरस्कार करीत. ब्राह्मण तिरस्कार करीत, शूद्र किंवा वृषल यांच्या पंक्तीस बसवीत, म्हणून अशोकादि सम्राट् हि बौद्धजैनादींच्या पाखंडांचा पुरस्कार करूं लागले. मग लुप्तक्रिय झालेल्या सामान्य वैश्यक्षत्रियांची गोष्ट च काढावयाला नको. असा हा फेरफार पाणिनि व कात्यायनपतंजलि यांच्या कालांच्या दरम्यान् झालेला होता. क्रियाकर्मान्तर व धर्मधर्मान्तर या बाबींत हें जें भयंकर परिवर्तन झालें त्यांचीं मुळें स्त्रिया व शूद्र यांच्याशीं ब्राह्मणक्षत्रियवैश्यादि त्रैवर्णिकांचें जें शेकडों वर्षें वर्तन घडत येत होतें त्यांत गुरफटलेलीं आहेत. तीं मुळें शोधून काढण्याचा व त्यांची परिनाळिका अथ पासून इति पर्यंत साद्यन्त लाविण्याचा उद्योग केवळ बोधप्रद च नव्हे तर मोठा फलप्रद होण्याची शक्यता आहे. फार काय सांगावें, चातुर्वर्ण्याचा इतिहास म्हणजे त्यांतील स्त्रिया व शूद्र यांचा इतिहास प्रामुख्येंकरून आहे. ह्या प्रचंड ऐतिहासिक नाटकांत ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हीं तीन पात्रें एका बाजूस आपलीं आसनें सदैव स्थिर करण्यांत गुंतलेलीं दिसतात आणि तीं आसनें डळमळविण्याचा भगीरथ प्रयत्न करणारें शूद्र हें पात्र दुसऱ्या बाजूस जिवापाड मेहनत घेतांना आढळतें. ह्या झगड्यांत विजयश्री कधीं ब्राह्मणादींच्या गळ्यांत माळ घालते व कधीं शूद्रा वर फिदा होते; आणि शेवटीं दोन्ही पक्ष हार न खातां, तिसरें पात्र जें स्त्री त्याच्या द्वारा, तडजोडीनें वेळोवेळीं भांडण मिटवितांना दृष्टीस पडतात.

७६ ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हीं तीन पात्रें एका बाजूस लढाईस सज्ज झालेलीं दिसतात म्हणून वर सांगितलें. त्यांतील ब्राह्मण हें पात्र सर्वांत प्रधान समजावें. बाकींचीं दोन्हीं पात्रें ब्राह्मणाच्या अनुषंगानें वागणारीं होत. त्यांतून वैश्य हें पात्र तर अत्यन्त सौम्य व निरुपद्रवी आहे. ऋग्वेद-कालाच्या अगदीं पहिल्या थराच्या हि पलीकडील काळांत ब्राह्मण हें एक च पात्र होतें. मूलतः ब्राह्मणाचा वर्ण शुक्लभास्वर, मनोरचना देव-धार्मिक, आणि हव्यास आत्मानात्मविचाराचा. ह्या ब्राह्मण नांवाच्या आर्षलोकांना पामीरच्या पठारा वर वर्णानें लाल अश्या दुसऱ्या एका लोकांची गांठ पडली. हे रक्तवर्ण लोक शौर्यानें सिंहा सारखे, क्रौर्यानें लांडग्या सारखे, कजाखीनें कुक्कुटा प्रमाणें, सोशिकपणानें कुत्र्या सारखे असून, डोक्याचे किंचित् मंद असत. ऐतरेयारण्यककारानें तर क्षत्राची व्याघ्राला उपमा दिली आहे. क्षत्रं वा एतद् आरण्यानां पशूनां यद् व्याघ्रः। ह्या मंदडोक्याच्या रक्तवर्ण लोकां वर तीव्रडोक्याच्या शुक्लवर्ण ब्राह्मणांनीं बेमालूम छाप बसविली आणि वेदवाङ्मयांत गाजणारें जें ब्रह्मक्षत्रनामक द्वंद्व तें निर्माण केलें. तीव्र डोकें व कणखर मनगटें यांच्या बलिष्ठ सामर्थ्या पुढें सर्व शत्रू नामोहरम होऊन ब्रह्मक्षत्राचा सर्वत्र विजय झाला. वर्णभिन्नत्वा स्तव व भिन्नयूथत्वा स्तव ब्रह्मांत व क्षत्रांत बेटीव्यवहार अत्यन्त प्राचीन कालीं होत नसे, आणि पुढेंपुढें यद्यपि अल्पस्वल्प होऊं लागला, तथापि बेटीव्यवहारा पासून अलिप्त राहण्याचा ब्राह्मणांचा कटाक्ष तेव्हां हि सध्यां प्रमाणें च जाज्वल्य होता. म्हणजे वर्ण-शुद्धि राखण्याची बुद्धि ब्राह्मणांत फार प्राचीन काळा पासून उपजत असलेली दिसते. जातिसंस्था जी पुढें कालान्तरानें इतक्या अवाढव्य नामारूपास आली तिचीं मुळें ब्राह्मणसमाजांत हीं अशीं फार प्राचीनतम आहेत. शुक्लवर्ण ब्राह्मणांचा व रक्तवर्ण क्षत्रियांचा हा असा द्वंद्वसमास होऊन फार काळ लोटला नाहीं तों ह्या द्वंद्वाची तिसऱ्या एका पीतवर्ण टोळीशीं गांठ पडली. ह्या टोळींतील लोक कृषि, पाशुपाल्य व वाणिज्य करण्यांत कुशल असून, स्वास्थ्याच्या कलांत ब्रह्मक्षत्रां हून जास्त पटाईत असत, परंतु डावपेंचांच्या व ठोकाठोकीच्या कामांत पंगू असत. ह्या पंगू परंतु द्रव्योत्पादक टोळीला ब्रह्मक्षत्रांनीं विश् हें नांव ठेविलें; परंतु यांचें मूळ नांव पणि असावें व हे पाश्चिमे कडील पणि लोकांचे— ज्यांना आधुनिक यूरोपियन लोक फिनिशियन व प्राचीन रोमन लोक प्यूनिक म्हणतात त्यांचे— सवंश्य असावे किंवा पूर्वे कडील पीतवर्ण चिनी लोकांशीं वंशसंबद्ध असावे. कसें हि असो, ह्या पीतवर्ण विशांस सामील करून घेऊन ब्रह्मक्षत्रांनीं वेदप्रसिद्ध त्रैवर्ण्य पैदा केलें. ब्रह्मक्षत्राचा व विशाचा फार प्राचीन काळीं बेटीव्यवहार वर्णभिन्नत्वा स्तव व भिन्न-

यूथत्वा स्तव होत नसे हें सांगावयाला नको च, आणि कालान्तरानें पुढेंपुढें यद्यपि क्वचित् झाला तत्रापि तो म्हणण्या सारख्या प्रकर्षास कधीं च पोहोंचला नाहीं. अश्या तऱ्हेनें क्रमयोगें करून विकास पावलेलें हें त्र्यैवर्ण्य पामीरप्रदेशांतून दक्षिण-दिशेनें उत्तरकुरु, हिरण्मय, रम्यक, इलावृत, हरिवर्ष, किंपुरुष, अश्या उत्तरोत्तर दक्षिणे कडील देशांतून भारतवर्ष म्हणून ज्यास पुढें म्हणूं लागले त्या देशांत उतरलें. हिमालया पलीकडील उत्तरकुरु व उत्तरमद्र ह्या प्रांतांत असतांना ह्या त्रैवर्णिकांची कृष्णवर्ण अश्या शूद्र नामक अर्धरानटी लोकांशीं प्रथम गांठ पडली, आणि त्या लोकांना माणसाळवून त्यांना त्यांनीं आपलें दास्यकर्म करण्यास लाविलें. दास्यकर्म करावयास लाविलें म्हणजे त्यांच्या वर जुलूम केला असा अर्थ घ्यावयाचा नाहीं. त्रैवर्णिक ज्याला दास्यकर्म म्हणत तें अर्धरानटी शुद्र उच्च व सुखाचें कर्म समजत. सध्यां महार-मांग लोक यूरोपियनांच्या रेलवे वर खडी फोडण्यांत जसा अभिमान बाळगतात व ग्रामसंस्थेंत महारकी करीत बसण्या पेक्षां खडी फोडण्याची कामगिरी कर-ण्यांत उच्चतर व किफायतशीर धंदा मिळाला म्हणून संतोष मानतात, तसा च अभिमान व संतोष त्रैवर्णिकांची वेठबेगार करण्यांत त्या कालच्या अर्धरानटी शूद्रांना वाटे. ह्या रानटी शूद्रांशीं प्रथम बेटीव्यवहार त्रैवर्णिक करीत नसत. रानटी शूद्र माणसाळल्या वर त्रैवर्णिकांनीं चातुवर्ण्यनामक जी त्रिखंडप्रसिद्ध समाजसंस्था ती निर्माण केली. त्रैवर्णिकांनीं ही चातुर्वर्ण्यसंस्था प्रथम उत्तरकुरु व उत्तरमद्र नांवाचे हिमालयाच्या पलीकडे देश होते त्यांत सुरू केली. ह्या नवीन संस्थेचें सुंदर व भव्य वर्णन ऋग्वेदांतील पुरुषसूक्तांत प्रथम केलेलें आढळतें. आर्यांनीं ही जी नवीन संस्था स्थापिली तिचें वर्णन ह्या सूक्तांत आलें असल्यामुळें, राजनीतिशास्त्रदृष्ट्या व समाजशास्त्रदृष्ट्या ह्या नामांकित सूक्तांचें महत्व अपरंपार आहे. यास्क, शंकर, सायण, दयानंद व पाश्चात्य पंडित इत्यादींनीं ह्या सूक्ता वर बहुत पांडित्य केलें आहे. परंतु ह्यांच्या पैकीं कोणाच्या हि लक्ष्यांत ह्या सूक्ताचा खरा अर्थ व खरें मर्म आलें नाहीं. करतां, सदर सूक्ताच्या विशदीकरणार्थ एक स्वतंत्र रकाना च खर्च करणें प्राप्त आहे.

६७ पुरुषसूक्तांत प्रथम वर्णन ब्रह्मांडरचनेचें ऊर्फ भुवनसंस्थेचें ऊर्फ आदिपुरुषाचें केलें असून, त्या भुवनसंस्थेंत विराट्–पुरुषाची उत्पत्ति कशी झाली तें सांगितलें आहे, आणि नंतर त्या विराट्–पुरुषाच्या मुखादि अवयवां वर चातुर्वर्ण्याची उत्प्रेक्षा केली आहे. पुरुष व विराट् हे दोन शब्द ह्या सूक्तांत प्रस्तुतविवेचनदृष्टीनें महत्वाचे आहेत. पुरुषः पुरिषादः पुरिशयः पूरयते वा, अशी निरुक्ति यास्क करतो. म्हणजे पुरुष शब्द सद्, शी किंवा पॄ ह्या तिहीं पैकीं

वाटेल त्या धातू पासून व्युत्पादावा, असें यास्क म्हणतो. पुरु बद्दल पुरि असा हि फरक यास्क सुचवितो. पुरि म्हणजे संसारे असा अर्थ शंकराचार्य देतात व पुरु हा पुरि शब्दाचा अपरपर्याय आहे असा आशय दाखवितात. पुरु म्हणजे पुरि काय म्हणून समजावयाचें तें कोणी च साधार सांगत नाहीं. वस्तुतः पुरु शब्दाचा अनेक, पुष्कळ, असा अर्थ आहे, आणि तो घेऊन निरुक्ति उत्तम होत्ये. सद्, शी किंवा पॄ हे तीन धातू हि पुरुषशब्दाच्या निरुक्तींत नीट काम देत नाहींत. सद् चा द् काय म्हणून गळाला, शचा ष काय म्हणून झाला व पॄ ला इष् कोठून काय अर्थानें चिकटला, इत्यादि शंका या तिन्ही धातू संबंधानें घेतां येतात. वस्तुतः पुरुष हा शब्द पूर्ववैदिककालीन असून तो पुरु व अस् या दोन शब्दां पासून झाला आहे. पुरु म्हणजे अनेक, सर्व, आणि अस् म्हणजे असणें. अस् पासून पूर्ववैदिक नाम, अलोप होऊन, सः होई. पुरु+सः =पुरुषः । पुरुषः म्हणजे सर्वत्र असणारा, अनेक असणारा, सर्व व्यापून असणारा. तदुपकारक किंवा तदंशभूत सर्व अवयवांना व्यापून असणारी जी वस्तु ती पुरुष या शब्दानें सूक्तकारानें उल्लेखिली आहे. अश्या सर्वावयवव्यापक वस्तूला सध्यां आपण संस्था म्हणतों. तात्पर्य, पुरुष म्हणजे संस्था असा सूक्तकाराचा आशय आहे. संस्था हा शब्द स्त्रीलिंगी आहे व पुरुष हा शब्द त्या च अर्थाचा पुल्लिंगी आहे, एवढा च फरक. ब्रह्मांडरूप आदिभुवनसंस्था निर्माण झाल्या वर, नंतर विराट्संस्था ऊर्फ विराट्पुरुष उत्पन्न झाला, असें सूक्तकार सांगतो. आतां विराट् या शब्दाचा अर्थ हुडकूं. विराट् म्हणजे ब्रह्मांडदेह असा सायणाचार्य अर्थ घेतात व सबंद ऋचा जीवात्मपरमात्मपर आहे असें प्रतिपादितात. वास्तविक अर्थ अगदीं निराळा आहे. विराज्, विराट्, हें उत्तरकुरूंतील व उत्तरमद्रदेशांतील ऋग्वेदकालीन राजांचें सामान्य नांव आहे. ऐतरेयब्राह्मणाच्या आठव्या पंचिकेच्या चौदाव्या खंडांत व इतरत्र हा विराज् शब्द येतो. तेथें ब्राह्मणकारानें ह्या शब्दाच्या अर्थाचा स्पष्ट खुलासा केला आहे.

> एतस्यां उदीच्यां दिशि ये के च परेण हिमवन्तं
> जनपदा उत्तरकुरव उत्तरमद्रा इति वैराज्यायैव
> ते अभिषिच्यन्ते विराळिति एनान् अभिषिक्तान्
> आचक्षते ।

तात्पर्य, विराज् म्हणजे हिमालयाच्या पलीकडील उत्तरकुरु व उत्तरमद्र या देशांतील राजांचें सामान्य अभिधान. उत्तरमद्रांत व उत्तरकुरूंत त्रैवर्णिक आल्या वर, तेथें त्यांनीं जी एक राज्यपद्धति स्थापिली तिचें नांव वैराज्य. वैराज्यं नाम वैशिष्ट्येन राज्यं. सामान्य साध्या राज्या हून कांहीं एका विशिष्ट प्रकारानें भिन्न अशी जी राज्यपद्धति ती वैराज्य. त्रैवर्णिकांची सामान्य साधी राज्यपद्धति त्या

काली सर्वप्रसिद्ध च होती. तिच्या हून निराळी अशी जी चातुर्वर्णिकांची अभिनव राज्यपद्धति तिला उत्तरकुरु व उत्तरमद्र देशांतील लोकांनीं वैराज्य हें नांव दिलें आणि त्याचें गुणवर्णन करणारें जें राष्ट्रीय किंवा वैराष्ट्रीय गीत त्याचें नांव पुरुषसूक्त म्हणजे राष्ट्रीय संस्थेचें गोड गाणें असें ठेविलें. ही नवीन राज्यसंस्था निर्माण केली त्या वेळीं त्याचे किती घटक केले तें हि सूक्तकार सांगतो. यत् पुरुषं व्यदधुः कतिधा व्यकल्पयन्? यदा विराट्-संस्थां स्थापितवन्तः तदा तस्याः कति विभागान् चक्रुः? सूक्तकार म्हणतो ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशी चतुष्पाद राज्यसंस्था निर्माण केली. काबाडकष्टाचीं कामें शूद्र करूं लागले, द्रव्योत्पादनाचें काम वैश्य संपादूं लागले, आणि राष्ट्रसंरक्षाणाचें काम क्षत्रिय पाहूं लागले, तेव्हां विराजाच्या कृपेनें स्वास्थ्य मिळून ब्राह्मणांनीं चार वेद निर्माण केले आणि त्या निर्मितीचें श्रेय विराट्-संस्थारूपी यज्ञास दिलें. तत्कालीन लोक ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या लोकांना च तेवढे राज्याचीं अंगें समजून स्वस्थ बसत नसत; तर पशु, पक्षी, सूर्य, चंद्र, इंद्र, अग्नि, वायु, अंतरिक्ष, द्यावापृथिवी, हीं सर्व राज्याचीं च अंगें समजत. असा हा वैराष्ट्ररूपी यज्ञ विराट्संस्थारूपी यज्ञाच्या साहाय्यानें संपादन झाला आणि ह्या यज्ञसंपादणीनें ते यज्ञकर्ते म्हणजे संस्थास्थापक साध्य-देवांच्या महनीय पंक्तीस जाऊन बसले म्हणजे अक्षय्य कीर्ति मिळविते झाले. असा ह्या सूक्ताचा उघडउघड अर्थ आहे. केवळ परमेश्वरपर किंवा केवळ अध्यात्मपर किंवा केवळ यज्ञपर अर्थ ओढाताण करून करितां येणार नाहीं असें नाहीं. परंतु, साधा, सरळ वाच्यार्थ हा असा वैराज्यसंस्थावर्णनात्मक आहे.

७८ विराड्राज्यपद्धतींल ह्या चातुर्वर्ण्यसंस्थेचा शूद्रांच्या सामाजिक स्थिती वर चांगला परिणाम घडला. त्रैवार्णिकांच्या समाजांत एव्हां पर्यंत शूद्राला आपलें स्वतःचें असें हक्काचें स्थान नसे. तें हक्काचें स्थान चातुर्वर्ण्यसंस्थेच्या निर्मितीनें शूद्रास कायमचें मिळालें. आजपर्यंत शूद्राला त्रिवर्णबाह्य, अस्पृश्य व ओंगळ समजत. एथून पुढें तो चातुर्वर्ण्यान्तर्गत, स्पृश्य व सोंगळ समजला जाऊं लागला. चातुर्वर्ण्यांत घेतल्या मुळें, चातुर्वर्ण्याचे सामान्य धर्म पाळण्याची त्याच्या वर जबाबदारी हि आली. उंदीर, कुत्रीं, सर्प, इत्यादि गलिच्छ व निषिद्ध मांसें शूद्रास चातुर्वर्ण्यांत आल्या पासून सोडावीं लागलीं; यथाशक्ति स्वच्छ राहून शौचधर्म पाळण्याची आवश्यकता भासूं लागली; चोऱ्यामाऱ्या करून परस्वापहरणा पासून पराङ्मुख व्हावें लागलें; आणि इंद्रियांची स्वैरगति नियमित करावी लागली. तात्पर्य, चातुर्वर्ण्यांत आल्यानें शूद्राची रानटी स्थितींतून ग्राम्यस्थितींत बढती झाली. शूद्राच्या ह्या बढती

पासून त्रैवर्णिकांचें हि हित झालें. ज्या ज्या प्रांतांत आर्य वसाहत करण्यास जात त्या त्या प्रांतांतील कमजास्त रानटी अनार्यांचें करावें काय, ही विवंचना आजपर्यंत आर्यांना सदोदित पीडा करीत असे. अनार्य चोऱ्या करीत, आश्रम लुटीत, गाई मारीत, खऱ्याखोट्याचा विधिनिषेध बाळगीत नसत, व्यर्थ हिंसा करीत आणि आर्यस्त्रियांशीं असभ्यतेनें वागत. अश्या स्वैरवृत्तीच्या रानटी लोकांचें नियमन कोणत्या सुयुक्त तऱ्हेनें करावें, तें आर्यांना बहुत कालपर्यंत यथायुक्त कळलें नव्हतें. स्वाऱ्या, पाठलाग, शिकार करून अनार्यांचा समूळ विध्वंस होत नाहीं, हें अनुभवान्तीं आर्यांस मोठ्या कष्टानें कबूल करावें लागे. शिवाय, अपराधी अनार्यां बरोबर निरपराधी अनार्यांची हि हिंसा करणें आर्यांच्या भूतदयेला काळिमा आणी. कित्येक अनार्य आर्यांच्या वारंवार उपयोगी हि पडत व आर्यधर्मानें चालण्याची आपली लायकी हि दर्शवीत. अश्या स्थितींत सुधारणाक्षम अनार्यांचा वर्णसंस्थेंत समावेश करून घेण्याची कॢप्ति कांहीं कल्पक आर्यांस सुचली आणि ती कॢप्ति त्यांनीं प्रथम उत्तरकुरुदेशांत अमलांत आणिली. उत्तरकुरूंत ह्या कॢप्तीला अंदाजा बाहेर यश आलें. चोऱ्या बंद झाल्या, आर्यस्त्रियांशीं असभ्य वर्तन दिसतनासें झालें, अशास्त्र हिंसा लुप्त होऊन गेली, इतकें च नव्हें तर शूद्रांनीं सर्व दासकर्म आटोपल्या मुळें, स्वास्थ्य व फुरसत मुबलक मिळून, वैश्यांना व्यापारधंद्या कडे, क्षत्रियांना देशसंरक्षणा कडे व ब्राह्मणांना विद्यावृद्धी कडे लक्ष्य देण्यास सांपडून राष्ट्रांची चोहोंबाजूनें भरभराट झाली. आफ्रिकन गुलाम मिळाल्या मुळें, यूरोपियन व अमेरिकन राष्ट्रांची गेल्या च्यारशें वर्षांत जशी अभूतपूर्व भरभराट व प्रगति झाली, तशी च प्रगति उत्तरकुरूंतील आर्यांची शूद्रप्राप्तीनें झाली. पुरुषसूक्तकार मोठ्या दिमाखानें व फुशारकीनें सांगतो कीं, विराट्संस्था स्थापन होऊन, चातुर्वर्ण्याची समाजपद्धत सुरू झाल्या पासून, घोडे, गाई, शेळ्यामेंढ्या, इत्यादि संपत्ति वाढून, ऋक्, यजुः, साम व अथर्व ह्या च्यार वेदांचें उपबृंहण झालें आणि वैराज्य भोंवतालील सर्व भूमि आक्रमून बसलें. स ( विराट् ) जातः अत्यरिच्यत पश्चाद् भूमिं अथो पुरः । चातुर्वर्ण्यसंस्था राष्ट्रोन्नतीला अत्यंत उपकारक होते, असा उत्तरकुरूंत अनुभव आल्या वर, तिचा प्रसार व अनुकार त्रैवर्णिकांच्या भरतखंडांतील सर्व वसाहतींत झाला. मत्स्य, कुरु, पांचाल, कोसल, विदेह, मगध, सूरसेन, चेदि, निषध, मालव, सुराष्ट्र, इत्यादि वसाहतींत माणसाळण्या सारखे जे जे म्हणून अनार्य त्रैवर्णिकांना आढळले त्यांना वर्णव्यवस्थेंत नियत असें दासस्थान मुकरर करून आर्यांनीं चातुर्वर्ण्याची स्थापना व प्रसृति सर्व भरतखंडभर केली. ती चातुर्वर्ण्यपद्धति पाणिनिकाला पर्यंत बहुतेक अभंग चालली.

७९ बहुतेक हा शब्द वरील वाक्यांत घालण्याचें कारण असें कीं, चातुर्वर्ण्यान्तर्गत शूद्राची स्थिति पुरुषसूक्तरचनाकाल व पाणिनिकाल यांच्या दरम्यान् सुधारत चालली होती. पुरुषसूक्तकालीं शूद्राला वर्णव्यवस्थेंत नियत स्थान मिळालें एवढेंच काय तें, ह्याहून जास्त लगट तत्कालीन आर्यांनीं शूद्राला राजरोस करूं दिली नाहीं. फेपट्या नाकाच्या व कृष्णवर्णाच्या शूद्रस्त्रीशीं विशेष सलगी करणें हि तत्कालीन शुक्लवर्ण व सरलनासिक आर्यांना पसंत नसे, मग साक्षात् धर्म्य शरीरसंबंधाची वार्ता कोठून ? शूद्रानें झाडलोट करावी, लांकूडफाटें आणावें, बैठकबिछाना साफसूफ ठेवावा, आणि धनी देईल तो तुकडा खाऊन कुत्र्या प्रमाणें घराच्या पडवींत गुराढोरां शेजारीं धन्याचें हितचिंतन करीत सुखानें रहावें. त्रैवर्णिक स्त्रीकडे तर त्यानें वर डोळे करून पाहिलेलें हि खपत नसे. कालान्तरानें ह्या दूरीभावांत फरक पडला. प्रथम फरकाला तोंड ब्राह्मणद्वारा किंवा क्षत्रियद्वारा पडलें नाहीं, वैश्यद्वारा पडलें. कृषि, पाशुपाल्य व बेपार करणाऱ्या वैश्याला हाता खालीं राबविण्या करितां घरीं बरे च शूद्र ठेविणें जरूर पडे. घरींदारीं, शेतीवाडींत, हाट बाजारांत सर्व व्यवहार शूद्रसाहाय्यानें होई. अर्थात् शूद्रांतील नरमाद्यांचा वैश्यगृहांतील स्त्रीपुरुषांशीं एकान्तीं लोकान्तीं संबंध पडे. त्या निमित्तानें शूद्रस्त्रीपुरुषांचा वैश्यस्त्रीपुरुषांशीं अधर्म्य शरीरसंबंध होई. वैश्यशूद्रांतील हा चोरटा व्यवहार यजुःसंहिताकालीं इतक्या प्रमाणा वर वाढला होता कीं ब्राह्मणक्षत्रियसमाजांत तो एक थट्टेचा विषय होऊन बसला होता. एतत्संबंधीं पुरावा ज्यांस पहावयाचा असेल त्यांनीं कृष्णयजुःसंहितेच्या सातव्या कांडाच्या चवथ्या प्रपाठकाचा एकूणविसावा अनुवाक व शुक्लयजुःसंहितेचा तेविसावा अध्याय पहावा. अश्वमेधयज्ञ हा विषय आहे. तत्संबंधक प्रक्रियेंत अनेक अश्लील संवाद यज्ञकर्मांत भाग घेणाऱ्या संभावित स्त्रीपुरुषांना तोंडपाठ म्हणावे लागत. पैकीं क्षत्ता व पालागली यांच्या संवादाचें भाषांतर देतों. क्षत्ता पालागलीला म्हणतो, शूद्रीण जेव्हां वैश्याशीं घोरून रत होत्ये तेव्हां तिचें समाधान म्हणून होत नाहीं ! या विधानाला पालागली उत्तर करत्ये कीं, शूद्रपुरुष वैश्यस्त्रीशीं जेव्हां रममाण होतो तेव्हां त्याची तरी तृप्ति कोठें होते ! हें ग्राम्य संभाषण अश्वमेधयज्ञा सारख्या मोठ्या उत्सवांत हजारों सभ्यांच्या पुढें होत असे हें लक्ष्यांत घेतलें म्हणजे वैश्यशूद्रांमधील हा असद्व्यवहार चव्हाट्या वर आणण्याच्या योग्यतेचा झाला होता हें स्पष्ट होतें. हा वैश्यशूद्रीय असद्व्यवहार पुरुषसूक्तकाल व यजुःसंहिताकाल यांच्या दरम्यान्च्या काळांतला आहे. असो. सांगण्याचा मुद्दा काय कीं, त्रैवर्णिक व शूद्र यांच्यांतील दूरीभावांत फरक वैश्यांच्या द्वारा प्रथम पडला. कालान्तरानें ह्या असद्व्यवहाराचा फैलाव क्षत्रियांत व ब्राह्मणांत हि पसरला. क्षत्रिय व

ब्राह्मण यांच्या घरांतून शूद्रिणी कामधंद्याला असत. त्यांच्याशीं प्रथम चोरून व्यवहार ब्राह्मणक्षत्रिय करूं लागले. आणि नंतर घरोघरीं एक च परी आहे असें जेव्हां अन्योन्यज्ञान झालें, तेव्हां शूद्रिणींशीं ब्राह्मणक्षत्रिय राजरोस व्यवहार करूं लागले. हा प्रकार तिन्ही वर्गांत रूढ झालेला पाहून, तत्कालीन सच्छील ब्राह्मणांनीं त्रैवर्णिकांना शूद्रस्त्रियांशीं विवाह करण्याची परवानगी दिली व त्या विवाहाला गौणविवाह असें धर्मशास्त्रीय संभावित नांव ठेविलें. हा गौणविवाह पाणिनिकालीं कुत्सित व निंद्य समजत व शूद्रस्त्री करणाऱ्या ब्राह्मणाला किंवा क्षत्रियाला किंवा वैश्याला शूद्राभार्यः म्हणून नांवें ठेवीत. शूद्रस्त्री पासून होणारीं अपत्यें पाणिनिकाला पर्यंत पितृजातीय म्हणजे पित्याच्या वर्णाचीं समजत. स्त्री कोणत्या हि वंशांतील असो, तिच्या पासून झालेलें अपत्य पितृजातीय धरण्याची चाल त्रैवर्णिकांत फार पुरातन आहे. अपत्य पित्याच्या वर्णाचें समजत, हें सिद्ध करणारीं कांहीं द्वंद्वें च येथें देतों, म्हणजे जास्त पाल्हाळ करण्याचें कारण पडणार नाहीं:—

| पिता | | माता | | अपत्य |
|---|---|---|---|---|
| ( १ ) शंतनु ( क्षत्रिय ) | × | गंगा ( अनामकवर्णीय ) | = | भीष्म ( क्षत्रिय ) |
| ( २ ) पाराशर ( ब्राह्मण ) | × | मत्स्यगंधा ( धीवरी ) | = | कृष्णद्वैपायन ( ब्राह्मण ) |
| ( ३ ) शंतनु ( क्ष. ) | × | मत्स्यगंधा ( धीवरीशूद्र ) | = | विचित्रवीर्य ( क्ष. ) |
| ( ४ ) विश्वामित्र ( क्ष. ) | × | मेनका ( अप्सरा ) | = | शकुंतला ( क्ष. ) |
| ययाति ( क्ष. ) | × | देवयानि ( ब्रा. ) | = | यदु ( क्ष. ) |
| ययाति ( क्ष. ) | × | शर्मिष्ठा ( असुरी ) | = | द्रुह्यु ( क्ष. ) |
| जरत्कारु ( ब्रा. ) | × | जरत्कारी ( नागवंशी ) | = | आस्तिक ( ब्रा. ) |

वसिष्ठ, ऋष्यशृंग, काश्यप, वेद, तांड्य, कृप, काक्षिवत्, कमठ, यवक्रीत, द्रोण, आयु, मतंग, दत्त, द्रुपद, मत्स्य ( शांतिपर्व अध्याय २९६ ) इत्यादि हीनवर्णमातृत्पन्न ब्राह्मणांचीं आणीक शेंकडो उदाहरणें देतां येतील. अपत्य पित्याच्या वर्णानें मोजण्याची ही चाल त्रैवर्णिकांनीं शूद्रां पासून झालेल्या अपत्यांस हि साहजिकपणें लाविली. ह्या लापनिकेचा त्रैवर्णिक समाजांत फार विलक्षण परिणाम झाला. अप्सरस्, असुर, नाग, देव, इत्यादि वंशांतील स्त्रियांशीं त्रैवर्णिकांचे जे संबंध झाले ते शूद्रास्त्रियांशीं जे असंख्य संबंध झाले त्याच्या अपेक्षेनें फार च तुरळक झाले. शूद्रस्त्रिया जश्या त्रैवर्णिकांच्या घरोघर दासकर्म संपादण्यास मिळाल्या, तश्या गंधर्व, नाग, असुर, देव, इत्यादींच्या स्त्रिया त्रैवर्णिकांच्या घरीं राबावयाला कधीं च राहिल्या नाहींत. वर्णानें गंधर्वादि लोक उजळ असल्या मुळें त्यांच्या पासून त्रैवर्णिकांच्या रक्तांत किंवा वर्णांत किंवा स्वभावांत किंवा चालीरितींत म्हणण्या सारखा फरक पडला नाहीं. शूद्रस्त्रीसमागमा पासून

मात्र त्रैवर्णिक रक्तांत, वर्णात, स्वभावांत व चालीरीतींत इतका मोठा फरक पडला कीं, समाजांतलि विचारी लोकांना तत्संबंधानें व तन्निवारणार्थ उपाय-योजना करणें अगत्याचें दिसलें. शूद्रस्त्रीसमागमा पासून त्रैवर्णिकांच्या कुटुंब-घटनेंत कोणत्या प्रकारचा फेरबदल झाला त्याचा तपशील असा. समजा कोणी एक अग्निचित् ब्राह्मण आहे. त्याला एक सहधर्माचरणार्थ सवर्ण म्हणजे ब्राह्मणवर्णाची पत्नी आहे. ह्या पतिपत्नींनीं घरकामा करितां एक शूद्रदासी तरी ठेवावी किंवा अग्निचित् ब्राह्मणानें शूद्रभार्या तरी करावी. दासी ठेविली आणि ब्राह्मणाची नीति चुकून दासी गर्भार राहिली, तर तो अनाचार गृहपत्नीला उघड्या डोळ्यानें पहावत नसे. मुळीं च शुद्री कामाला न ठेविली, तर घरांतलें सर्व काम एकट्या ब्राह्मणीच्यानें आटपत नसे. तशांत विटासपण, बाळंतपण, इत्यादि अडचणीं स्तव कायमची मोलकरीण गृहपत्नी-ला अवश्य असे. करतां, कायमचें मायेचें फुकट माणूस हाता खालीं राबावयाला सांपडावें म्हणून गृहपत्नीला त्यांतल्या त्यांत सपत्नीभाव गिळून ब्राह्मणाला शूद्री भार्या करून देणें जास्त सोईचें दिसे. अश्या तऱ्हेनें घरांत शूद्रस्त्री भार्या म्हणून प्रतिष्ठितपणें शिरली. तिला पोरें झालीं म्हणजे तीं पित्याच्या वर्णाचीं समजलीं जात. तशांत, ब्राह्मणानें, घरांत कामाचा पसारा विशेष असल्यास, जर दोन चार शूद्रस्त्रिया केल्या, तर ब्राह्मणाच्या घरांत शूद्र्युत्पन्न ब्राह्मणपोरांचें केवळ पेंव च फुटे. ब्राह्मणीचीं पोरें व शूद्रीचीं पोरें अशीं सर्व पोरें ब्राह्मण म्हणून गणिलीं जात. शूद्रीच्या पोरांना शूद्रीचे शौच-धर्म, शूद्रीचे अस्पष्ट उच्चार, शूद्रीचा कृष्णवर्ण व शूद्रीच्या माहेरच्या शूद्र माणसांची संगत लागून, ब्राह्मणाच्या घरांत एका प्रकारचे अपकृष्ट ब्राह्मण निपजत. हा च प्रकार क्षत्रियांच्या व वैश्यांच्या हि घरांत होई व तो ब्राह्मणाच्या घरांतल्या हून जास्त प्रमाणा वर होई. आतां इतकें खरें कीं, ब्राह्मणादीं-च्या घरांत ब्राह्मणादींच्या सहवासानें, शिक्षणानें व चालीरीतीनें शूद्रस्त्रीच्या पोरांचें शील केवळ शूद्र पोरांहून बहुत श्रेष्ठतर बने; परंतु त्यांच्या कातडी वरील मातेच्या कृष्णवर्णाची छटा कोणत्या हि सहवासानें धुवून जाण्या सारखी नसे. ही कृष्णवर्ण प्रजा बरी च वाढल्या वर ब्राह्मणांत शुक्लभास्वर वर्णाचे ब्राह्मण व कृष्णवर्णाचे ब्राह्मण, असे दोन रंगाचे ब्राह्मण दिसूं लागले. असा हा फेरबदल पाणिनिकाला पर्यंत होत होता. पडवींतलि गुराढोरांत पशुवत् कालक्रमणा करणारा उत्तरकुरूंतील शूद्र चढतां चढतां दक्षिणकुरूंत शूद्रस्त्रि-यांच्या उपयुक्त गुणांच्या जोरा वर त्रैवर्णिकांना व अग्निहोत्र्यांना जांवई करण्याच्या उच्चतम पायरी प्रत पोहोंचला. आचार, विचार, शौचधर्म, शास्त्र, व्यापार व राज्य यांच्यांत प्रगति करण्यास स्वास्थ्य मिळावें म्हणून अर्व-

रानटी शूद्रांचा समावेश त्रैवर्णिकांनी चातुर्वर्ण्य निर्मून करून घेतला खरा, परंतु तत्प्रीत्यर्थ त्यांना पुढें भरपूर भुर्दंड भरावा लागला.

८० पाणिनिकाला पर्यंत ह्या कृष्णवर्ण ब्राह्मणादींची संख्या बातावेताची च असल्या मुळें त्याच्या कालीं ह्या ब्राह्मणादींची कुत्सना विशेष होण्याचा प्रसंग उद्भवला नाहीं. तत्रापि, पाणिनीच्या काळीं सुद्धां ह्या कृष्णवर्ण ब्राह्मणादींची संख्या इतकी बरी च वाढली होती कीं शुक्लवर्ण त्रैवर्णिकांची व कृष्णवर्ण त्रैवर्णिकांची स्पर्धा होण्यापर्यंत पाळी आली. शुक्ल व कृष्ण पक्षांच्या स्पर्धेचें सर्वप्रसिद्ध उदाहरण म्हटलें म्हणजे तैत्तिरीयांचें व याज्ञवल्क्याचें भांडण. हें भांडण पाणिनिपूर्वी नुकतें च घडलें असावें. कारण पाणिनि याज्ञवल्कब्राह्मणाला ऊर्फ शतपथब्राह्मणाला अर्वाचीन म्हणतो ( ४–३–१०५ ). तैत्तिरीयसंहितेच्या ब्राह्मणभागाची भाषा व शतपथब्राह्मणाची भाषा समकालीन व सारख्या असून दोन्ही पाणिनीयभाषे हून किंचित् जुन्या व ऋग्भाषेहून बऱ्या च अर्वाचीन आहेत. वैशंपायन तैत्तिरि हा भीष्मपर्वाच्या नवव्या अध्यायांत उल्लेखिलेल्या तित्तिरिदेशाचा अभिजन असून कृष्णवर्ण ब्राह्मणांचा कैवारी होता आणि त्याचा भाचा याज्ञवल्क्य हा शुक्लवर्ण ब्राह्मणांचा पुरस्कर्ता होता. ह्या मामेभाच्यांच्या स्पर्धेचा असा कळस झाला कीं त्यांचे अनुयायी त्या काला पासून पुढें अन्योन्यशररिसंबंध हि करीतनासे झाले. पाणिनीच्या पूर्वी व पाणिनीच्या कालीं शुक्लकृष्णांची ही स्पर्धा शरीरसंबंधपराङ्मुखते पर्यंत च तेवढी पोहोंचली. पाणिनीच्या पश्चात् त्या स्पर्धेला जास्त तीव्र व भयंकर रूप प्राप्त झालें. शुक्लवर्ण ब्राह्मण कृष्णवर्ण ब्राह्मणांची शूद्रोत्पन्न म्हणून थट्टा करीत. ती सहन न होऊन कित्येक कृष्णवर्ण ब्राह्मणांनीं व क्षत्रियांनीं व वैश्यांनीं ब्राह्मणधर्मांची, आचाराची, यज्ञांची, श्राद्धांची, संस्कृतभाषेची, वेदाची व त्यांतील देवादिकांची निंदा करण्यास प्रारंभ केला आणि चातुर्वर्ण्य व ब्राह्मणादित्व यांना सोडचिठ्ठी दिली. दोन भिन्नसंस्कृतींच्या उत्कृष्टनिकृष्ट समाजां मध्यें शरीरसंबंध झाल्यानें हे असले प्रकार झाल्या शिवाय रहात नाहींत. प्रथम वर्णा वरून वैषम्य उत्पन्न होतें आणि तें वैषम्य नंतर आचार, देवधर्म, चालीरीति, वेदान्त, राजकारण, समाजव्यवस्था, इत्यादि समाजाच्या अंतस्थ, बहिःस्थ, शारीरिक व मानसिक अश्या सर्व हालचालींत भिनून, बहुरूपी सामाजिक क्रांति घडवून आणितें. वैषम्यानें स्पर्धा उत्पन्न होते. स्पर्धा उत्पन्न झाली म्हणजे दोन्ही पक्ष अन्योन्यदोष हुडकूं लागतात व दोषैकदृष्टि होऊन प्रतिपक्षांच्या गुणांना हि दोष समजून त्यांचा विटाळ धुवून टाकण्यास प्रवृत्त होतात. त्या प्रमाणें पाणिनिकाला नंतर हजारों कृष्णपक्षाभिमानी त्रैवर्णिकांनीं शुक्लपक्षाचा द्वेष करतां करतां मूळच्या ब्राह्मणधर्माचा च द्वेष आरंभिला

आणि ब्राह्मणांचें गुरुत्व झुगारून देण्याच्या इच्छेनें उपनयनादिक्रिया करण्याचें सोडून देऊन ब्राह्मणांचें मुखावलोकन हि करावयाचें नाहीं असा निश्चय केला. असले सावित्रीपतित व्रात्य ब्राह्मण भूर्जकंटक, अवंति, वाटधान, इत्यादि देशांत बहुत झाले; तसेंच सावित्रीपतित व्रात्य क्षत्रिय झल्ल, मल्ल, निच्छिवि, नट, करण, खस, द्रविड, पौंड्रक, औड्र, कांबोज, यवन, शक, पारद, पल्हव, चीन, किरात, दरद, इत्यादि त्या त्या देशांत झाले; आणि व्रात्य वैश्य करुष, सात्वत, इत्यादि देशपरत्वें झाले. ह्या लोकांची सावित्रीपतना पर्यंत प्रगति झाल्या वर ह्यांच्या पैकीं नट नामक व्रात्य क्षत्रियांत जिन व शक नामक व्रात्य क्षत्रियांत गौतम बुद्ध ऊर्फ शाक्यमुनि ह्या दोघांनीं स्वतंत्र अश्या वेदबाह्य व चातुर्वर्ण्यविरोधी मतांची स्थापना करून व देशांतील बहुतम व्रात्यांना व शूद्रांना एकजुटींत आणून शुद्धत्रैवर्णिकांचा अथवा शुद्ध चातुर्वर्णिकांचा वींमोड करण्याचा उद्योग आरंभिला. त्रैवर्णिकांचे ते भानगडीचे यज्ञयाग, क्लिष्ट शौचधर्म, सूक्ष्म उपनिषद्विचार, ह्या साऱ्याच्या मुळा वर ह्या दोघांनीं व ह्यांच्या सारख्या इतरांनीं इतके प्रहार केले कीं, सन्मार्गी व सद्धर्मी त्रैवर्णिकांना व विशेषतः ब्राह्मणांना खडबडून जागे होणें भाग पडलें आणि आलेल्या संकटाचें निवारण करावें लागलें. ह्या काळीं वैदिक संस्कृती वर संकटें ज्या अनेक बाजूंनीं आलेलीं होतीं त्यांची याद खालीलप्रमाणें:—

( अ ) जैनबौद्धांचा वैदिक धर्मा वर हल्ला चढण्या पूर्वीं पाणिनिकालाच्या अगोदर चार्वाकानें आपलें लोकायतिक मत शूद्रांत व शूद्रोत्पन्न त्रैवर्णिकांत पसरवून ठेविलें होतें. लोकायत म्हणजे सामान्य लोकांच्या मता प्रमाणें चालणारें व त्या मतावर अवलंबून असणारें. ह्या शब्दा वरून च पाणिनिपूर्वी सामान्य लोकांत वैदिक धर्मा बद्दल कुत्सितबुद्धि उत्पन्न झाली होती हें अनुमानतां येतें.

( आ ) जैनबौद्धांनीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची चातुर्वर्ण्यव्यवस्था मोडून सर्वांची एकजात व एकसमता करण्याचा उपदेश व उद्योग आरंभिला.

( इ ) जैनबौद्धांनीं शूद्रादि सर्व लोकांना समजणाऱ्या ज्या प्राकृत भाषा त्यांत लिहिण्याचा व बोलण्याचा उपक्रम करून त्रैवर्णिकांच्या संस्कृत व वैदिक भाषांना काट दिला. प्राकृत जनांच्या अपभ्रष्ट भाषांचा त्रैवर्णिक तिटकारा करीत, ही बाब जैनबौद्धांच्या पथ्या वर च पडली. संस्कृत व वैदिक भाषांना काट देण्यानें वेदांचें व वैदिक परंपरेचें हि उच्चाटन आयतें च झालें.

( ई ) पूर्ण अहिंसेचें मत पुकारून हिंसा करणाऱ्या यज्ञयागांना जैनबौद्धांनीं दुष्ट ठरविलें.

( उ ) पितृपूजामूलक श्राद्धकर्म बालिश ठरवून जैनबौद्धांनीं त्रैवर्णिकांच्या वंशपरंपरेला लत्ताप्रहार केला. शूद्र, वृषल व व्रात्य ह्यांना त्रैवर्णिकांचें शुद्धवंशत्व अगदीं वावडें भासे. तेव्हां ही हि बाब बौद्धजैनांना उपकारक च झाली.

( ऊ ) ज्या आश्रमधर्माच्या पाया वर ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे त्रैवर्णिक शूद्रांच्या कष्टा वर उपजीविका करीत, विशेषतः ब्राह्मण फुकट चरत, तो आश्रमधर्म बंद करून जैनबौद्ध स्वतः भिक्षु व श्रमण बनून ब्राह्मणां प्रमाणें इतर लोकां वर निर्वाह करूं लागले.

( ऋ ) घरांतील शूद्रस्त्रिया, शूद्रसेवक व शूद्रोत्पन्न ब्राह्मण पोरें यांच्या संख्याबाहुल्यानें व ह्यांच्याशीं च सदा व्यवहार पडल्यानें शुद्ध त्रैवर्णिकांच्या गृहपत्न्यांचा हि आचार, विचार व भाषा प्राकृत झाली. त्या मुळें घरांत मुख्य जो ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य तो एकटा च तेवढा संस्कृत बोलणारा व शुद्ध आचारविचार बाळगणारा राहिला. आर्यस्त्रिया हि केवळ शूद्रस्त्रीवत् होऊन गेल्या. एणें प्रमाणें गृहपति व गृहपत्नी यांचा दूरीभाव बौद्धजैनांच्या उपयोगी पडूं लागला.

( ॠ ) नट, करण, शक, निच्छिवि, इत्यादि व्रात्यांचे आयुधजीवी गण लढाऊ असल्या मुळें शुद्ध क्षत्रियांचीं राज्यें त्यांनीं आस्तेआस्ते आक्रमण केलीं आणि शेवटीं महानंदी शैशुनाग ह्या क्षत्रिय सम्राटाचा शूद्रागर्भोद्भव जो महापद्म नंदनामक पुत्र त्या शूद्रानें साम्राज्यपदारोहण केलें. ह्या महापद्म नंदानें शुद्ध क्षत्रियांचा संहार केला. एणें प्रमाणें त्रैवर्णिकांच्या हातची राजकीय सत्ता हि गेली. त्या मुळें जैनबौद्धांना निर्वाण दोन बोटें उरलें व ब्राह्मणादींचा अपकर्ष परा सीमेस पोहोंचला.

( ऌ ) जैनबौद्धांनीं स्याद्वाद, बहिःशून्यवाद, अन्तःशून्यवाद, सर्वशून्यवाद, सर्वक्षणिकवाद, इत्यादि मानसशास्त्रीय व अध्यात्मशास्त्रीय नवेनवे शोध करून, त्रैवर्णिकांच्या औपनिषद ज्ञानाला मागें टाकिलें आणि ब्राह्मणादींच्या अध्यात्मशोधक बुद्धीला हिणकस ठरविण्याचा घाट घातला.

( ॡ ) नवीन ऐतिह्य, नवीन दैवतें, नवीन नीति, नवीन प्रव्रज्या, प्रचलित करून व अल्पायासानें दीर्घफल प्राप्त करून देण्याच्या सामान्य जनांना

गुळचट थापा मारून बौद्धजैनांनीं शुद्ध त्रैवर्णिकांची व सामान्य प्राकृत जनतेची फाटाफूट व ताटातूट करून टाकिली.

त्रैवर्णिकां वर ओढवलेल्या विपत्तीची याद आणीक किती तरी वाढवितां येईल. एथें फक्त मुख्य मुख्य बाबींचा नामनिर्देश केला आहे. त्या वरून स्पष्ट दिसतें कीं जैनबौद्धांनीं शुद्ध ब्राह्मणादींचा पूर्ण पाडाव केला आणि शूद्रांचा पूर्ण विजय झाला. उत्तरकुरूंत जो अर्धरानटी शूद्र केवळ दासकर्म करून समाजसोपानाच्या अगदीं खालच्या पाह्यरी वर लाथाडला जात होता, तो आतां नंदांच्या व मौर्यांच्या शूद्र व वृषल राजवटींत अध्यात्म, नीति, प्रव्रज्या, एकवर्णता, सर्वसमता, व साम्राज्य यांचा विजयी चालक झाला. बुद्ध व जिन यांनीं, विशेषतः गौतम बुद्ध यानें, केलेली ही क्रांति केवळ सामान्य धर्मक्रांति नव्हे, किंवा राजक्रांति नव्हे, किंवा मतक्रांति नव्हे; ही सर्वव्यापी अशी भयंकर सामाजिक क्रांति होती. ह्या प्रचंड क्रांतीनें वैदिक समाजाचे पाये उखडून, चातुर्वर्णिक समाज सुलटाचा उलटा होऊन गेला. गौतम बुद्धा सारख्या व्रात्य क्षत्रियाच्या पुढारपणा खालीं वर्णभ्रष्ट शूद्रांनीं ब्राह्मणादीं वर मिळविलेल्या ह्या विजयानें यद्यपि धर्मभ्रष्ट बौद्धांचें शत्रुत्व ब्राह्मणादींनीं पत्करिलें, तत्रापि बुद्धाच्या अलौकिक कर्तबगारीचें कौतुक व आदर ब्राह्मण प्रांजलपणें केल्या शिवाय राहिले नाहींत. बुद्धाची गणना ब्राह्मणांनीं श्रीकृष्णादींच्या बरोबरीनें दशावतारांत केली, आणि ओढवलेल्या विपत्तीच्या परिमार्जनार्थ उपाययोजण्यास आरंभ केला. विपदि धैर्य हा ब्राह्मणाचा स्वभावसिद्ध गुण ह्या वेळीं जगाच्या प्रत्ययास आला. ह्या कालीं ब्राह्मणांच्या विरुद्ध बहुतेक सर्व जग उठल्या सारखें झालें. खुद्द ब्राह्मणां पैकीं कित्येक बुद्धभिक्षु झाले; क्षत्रिय व वैश्य यांच्या पैकीं शेकडोंनीं क्रियालोप करून व्रात्यपण अंगीकारिलें; आणि घरांतील स्त्रिया देखील शूद्रप्राय होऊन गेल्या. अशी दुरवस्था सभोंवार माजल्या मुळें, कात्यायनकालीं प्रत्यभिवादनविधींत ब्राह्मण इष्टानिष्ट प्रपंच करूं लागले. शुद्ध व सद्धर्मी क्षत्रिय किंवा वैश्य भेटावयास आला असतां ब्राह्मण प्रेमानें प्रत्यभिवाद करीत आणि व्रात्य क्षत्रिय किंवा वैश्य भेटला असतां प्रत्यभिवादा पासून पराङ्मुख होत. सर्व च स्त्रिया शूद्रवत् होऊन गेल्या मुळें, शुद्ध कीं भ्रष्ट हा निर्णय करण्याचें तात्कालिक साधन नसल्यानें, ब्राह्मण कोणत्या च वर्णाच्या स्त्रीचें प्रत्यभिवादन करीत नसत. पाणिनिकालीं त्रैवर्णिक स्त्रियांचें प्रत्यभिवादन गुरुस्थानीय ब्राह्मण अगत्यानें कां करीत व कात्यायनकालीं कां करीतनासे झाले, असा प्रश्न प्रस्तुत विवेचनाच्या प्रथमारंभीं उद्भवला होता. तसेंच पाणिनिकालीं सर्व क्षत्रियांचें व वैश्यांचें प्रत्यभिवादन ब्राह्मणगुरु अवश्यमेव कां करीत आणि कात्यायनकालीं कांहीं क्षत्रियवैश्यांना

प्रत्यभिवादनांतून कां वगळीत, असा हि प्रश्न निघाला होता. ह्या दोन प्रश्नांना उत्तरें देण्या करितां प्रस्तुत कलमा पर्यंतचा तपशील द्यावा लागला. त्या वरून प्रत्यभिवादनाभावाचें खरें कारण काय होतें तें कळून आलें. ब्राह्मण उन्मत्त होऊन स्त्रियांचा व वैश्यक्षत्रियांचा उपमर्द करीत असा प्रकार बिलकुल नव्हता. प्रकार अगदीं उलट होता. जे वैश्यक्षत्रिय उन्मार्गगामी व व्रात्य होऊन शिष्यत्व सोडून गेले व ज्या स्त्रिया शूद्रप्राय बनल्या त्यांचें प्रत्यभिवादन व कुशलचिंतन करणें ब्राह्मणांना लज्जास्पद झालें होतें. ह्या लज्जास्पद विपत्तींतून ब्राह्मणादि सद्धर्मी त्रैवर्णिक कसे तरून गेले त्या विषयाचा किंचित् उल्लेख पुढील कलमांत करूं.

८१ चातुर्वर्ण्यांत शूद्राला घेतल्या पासून व शूद्रस्त्रियांशीं विवाह करून तज्जन्य प्रजा त्रैवर्णिक मानिल्या पासून ही सर्व अनवस्था व क्रांति ओढवली आहे, हें ओळखून ब्राह्मणांनीं अद्याप चातुर्वर्ण्यांत राहिलेल्या शूद्र व शूद्रस्त्रिया ह्यांच्याशीं घडणार संबंध नियमित करण्याचा उपक्रम केला. चातुर्वर्ण्यांतून शूद्राला काढून लावणें अशक्य होतें व शक्य झालें असतें तरी त्रैवर्णिकांच्या फायद्याचें नसून उलटें नास्तिकांच्या व बौद्धांच्या संख्येंत भर घालणारें होतें. सबब, निष्कासनाचा मार्ग न धरतां, शूद्रनियमनाचा उपाय त्रैवर्णिकांनीं पत्करला. शूद्रस्त्रीजन्य प्रजा पितृजातीय एव्हांपर्यंत समजली गेल्यामुळें त्रैवर्णिकांत शौद्र रंग, शौद्र स्वभाव व शौद्र वृत्त यांचा प्रसार होऊन, जैनबौद्धादि पाखंडें जन्मास आलीं. सबब, धर्मज्ञांनीं व पूर्वेतिहासज्ञांनीं असा कायदा केला कीं, शूद्रस्त्रीशीं त्रैवर्णिकानें कोणत्या हि स्थितींत ( कस्मिन्नपि वृत्तान्ते ) व कसल्या हि आपत्तींत ( आपद्यपि ) विवाह करूं नये ( मनु, अध्याय ३ श्लोक १४ ). वृत्तान्ते म्हणजे इतिहासाख्याने असा अर्थ कुल्लूक करतो, परंतु तो दुष्ट आहे; कारण, भारतादि इतिहासांतून असल्या हीनजातीय विवाहांचीं हवीं तितकीं उदाहरणें सांपडतात. वृत्त म्हणजे वार्ता, स्थिति. अत्रि, गौतम, शौनक व भृगु ह्या पूर्वस्मृतिकारांचा एतत्पोषक हवाला भृगुसंहिताकार देतो. पाणिनीच्या नंतर झालेले सर्व स्मृतिकार ( उपलब्ध सर्व स्मृतींचे कर्ते पाणिनिनंतर झालेले आहेत ) व सूत्रकार ( बहुतेक सर्व उपलब्ध श्रौत, धर्म व गृह्यसूत्रें पाणिनिपश्चात्क आहेत ) हा च नियम सांगतात किंवा त्याचा ध्वनि करतात. वसिष्ठ म्हणतो कीं, नाग्निचित् शूद्रां उपेयात्, कृष्णवर्णा सा सरमा इव, न धर्माय. शांखायनश्रौतसूत्रकार तर ह्याच्या हि पुढें जाऊन शूद्राचा विटाळ हि गर्ह्य मानतो. न च शूद्रेण दोहयेत् ( २–८–३ ). शुद्रा कडून दूध हि पिळून घेऊं नये, इतका तीव्र कटाक्ष बौद्धक्रांती मुळें शूद्रा वरती ह्या सूत्रकाराचा होता. हा कायदा मोडला असतां फल काय मिळतें तें हि स्मृतिकार सांगतात.

कुविवाहानें म्हणजे शूद्राविवाहानें ब्राह्मण ब्राह्मण्या पासून च्युत होतो, केवल शूद्रस्त्री पासून च तेवढीं अपत्यें झालीं असतां घर शूद्रमय होऊन जातें, वेदाध्ययन बंद पडतें, ब्राह्मण अतिथि पराङ्मुख होतात, श्राद्धादि पित्र्यकर्में पितृदेव मान्य करीत नाहींत, व इंद्रादिदेव होम स्वीकारीत नाहींत, म्हणजे वैदिकधर्म म्हणून ज्याला म्हणतात तो सर्व उच्छिन्न होतो. ह्या फलाचा कटु अनुभव केवळ तर्कगम्य नव्हता, तर बौद्धक्रांतीनें त्रैवर्णिकांस साक्षात् आलेला होता. तो कटु अनुभव पुन्हां येऊं नये व वैदिकमार्ग पुन्हां पूर्ववत् सर्वत्र प्रचलित व्हावा, या हेतूनें शूद्राविवाहनिषेधाचा हा नामांकित कायदा पाणिन्युत्तरकालीन धर्मज्ञांनीं प्रचलित केला. ब्राह्मणजातींतील शूद्ररंगाची म्हणजे काळ्या रंगाची कन्या वरूं नये ( नोद्वहेत् कपिलां कन्यां ) एथपर्यंत तिटकाऱ्याची मजल येऊन ठेपली. ह्या कायद्यानें शूद्रस्त्रीशरीरसंबंध अजीबात बंद पडून अपकृष्ट त्रैवर्णिक निपजण्याची शक्यता च राहिली नाहीं. तत्रापि, ह्या कायद्याची अंमलबजावणी कशी करावयाची, ही एक तत्कालीन धर्मज्ञांना मोटी अडचण पडली. शूद्रस्त्रियांशीं विवाह करून, घरांत भोगास व कामकाजास हक्काच्या व मायेच्या मोलकरणी पैदा करण्याची संवय शतकेंच्या शतकें त्रैवर्णिकांना लागली होती. ती, कायदा केला म्हणून, तावडतोब जाईल, अशांतली साधी गोष्ट नव्हती. कायद्यानें एवढें च केलें कीं उत्कृष्ट विवाहनीति त्या संकटसमयीं कोणती तिचा त्रैवर्णिक समाजाला मार्ग दाखविला. ह्या महत्त्वाच्या कायद्याचा त्या हून जास्त उपयोग म्हणजे अंमलबजावणी एकदम होण्या सारखी नव्हती. सबब, धर्मज्ञांनीं दुसरा एक कायदा केला. तो असा कीं, त्रैवर्णिकांचीं शूद्रस्त्रीजन्य अपत्यें पितृसवर्ण न समजतां, मातृसवर्ण समजावीं. हा कायदा त्रैवर्णिक समाजाला मानला व त्याची अंमलबजावणी शक्य झाली. शूद्रस्त्रियांशीं लग्न लावण्याची जी दासकर्मोपयोगी रूढि त्रैवर्णिकांच्या इतकी आवडीची होती तिला धक्का बसला नाहीं आणि ब्राह्मण क्षत्रिय वैश्य या त्रैवर्णिकांत शूद्रस्त्रीजन्य प्रजेची भरती जी होत असे ती तर होण्याचें बंद झालें. कायदे करणारे व कायदे पाळणारे अश्या दोघांच्या हि हिताचे संपादक असे कायदे जेव्हां घडले जातात तेव्हां त्यांची अंमलबजावणी शक्य व सुकर होते. ह्या दुसऱ्या कायद्याचा असा परिणाम झाला कीं आजपर्यंत ब्राह्मण क्षत्रिय वैश्य व शूद्र हे चार वर्ण च चार जाति होत्या, त्या चार जातींच्या जोडीला आतां आणीक तीन पोटजाति समाजांत अस्तित्वांत आल्या. त्या तीन जाति म्हणजे ( १ ) ब्राह्मण × शूद्रा = निषाद ऊर्फ पारशव, ( २ ) क्षत्रिय × शूद्रा = उग्र, व ( ३ ) वैश्य × शूद्रा = करण ऊर्फ रथकार, ह्या होत. ह्या तीन जाति शूद्रसम धरल्या जात, परंतु चातुर्वर्ण्यातील चवथा वर्ण जो सच्छूद्रांचा तो ह्या संकरांना

आपल्या हून निराळा समजे. निषाद, पारशव, उग्र व करण, हीं चार हि नांवें भरतखंडांत पोट भरावयास आलेल्या किंवा एतद्देशज अनार्य व म्लेच्छ लोकांचीं आहेत. निषाद हे एथील भूमिज धीवर होत. पारशव हा शब्द पार्शव ह्या अक्षरविन्यासानें हि आढळतो. आणि हा च विन्यास ह्या शब्दाचा खरा होय. पर्शु नांवाच्या आयुधजीवी परदेशस्थ अनार्यांचा संघ पाणिनि उल्लेखितो. पर्शुसंबंधक जें तें पार्शव. पारशव हा खोटा पाठ घेऊन परस्मै शवाय हितः पारशवः इत्यादि व्युत्पत्ति केवळ अज्ञ आहे. उग्र हे पामीरच्या उत्तरे कडील ओगर अथवा ओग्र Uigur नांवाचे अनार्य लोक होत. करण ही हि एक अनार्य जाती च होती. ह्या अनार्य जातींशीं कांहीं एक कल्पित किंवा वास्तविक साम्य भासून तत्कालीन आर्यांनीं ह्या संकरांना हीं अनार्यांचीं नांवें दिलेलीं आहेत. आपल्या संकरांना अनार्यांचीं नांवें देण्याची खोड आर्यांना फार होती. उदाहरणार्थ, चंडाल हा शब्द चंड या अनार्य जातीं वरून आर्यांना सुचलेला आहे. शूद्रस्त्रीजन्य प्रजेच्या स्वतंत्र पोटजाति करून देण्याची ही क्लृप्ति यशस्वी झाल्या वर, त्रैवर्णिकांनीं आपल्यांतील अनुलोम विवाहांस हि तिचा अतिदेश केला. ब्राह्मण आणि क्षत्रिया, क्षत्रिय आणि वैश्या यांच्या प्रजेला ब्राह्मण व क्षत्रिय अशी पित्याच्या वर्णाची समजण्याची पुरातन चाल असे. तिच्या पासून हि अधर्माच्या भानगडी उपस्थित होत. करतां मातृसावर्ण्याचा कायदा ह्या हि प्रजेला लावून, वर्णसंकर व तज्जन्य धर्मसंकर त्रैवर्णिकांनीं समाजांतून बिलकुल काढून टाकिला. ह्या नवीन उपक्रमानें मूर्धावसिक्त, अंबष्ठ व माहिष्य अश्या तीन आणीक जाति समाजांत वाढल्या. ह्या जातींची प्रजा पितृवर्ण तर कायद्यानें च स्ववर्णीय मानीना आणि कमपणा येतो म्हणून मातृवर्ण हि आपल्यांत सामील करून घेईना. ओघास च आलें कीं ह्या प्रजेनें आपापल्या स्वतंत्र जाति कराव्या. अश्या तऱ्हेनें चार वर्ण व सहा जाति मिळून दहा जाति समाजांत झाल्या. अश्या ह्या जाति समाजांत निरनिराळ्या परिस्थित्यनुरूप वाढत जाऊन चातुर्वर्णिक समाजाला स्वास्थ्य मिळण्याची सोय होत असतां, निरनिराळ्या जातींना पृथक्पृथक् वृत्ति ऊर्फ धंदा करून देऊन जेणें करून वृत्तिसंकर होऊन समाजांत अस्वास्थ्य न माजेल अशी हि योजना धर्मज्ञांना करावी लागली. ह्या योजने प्रीत्यर्थ धर्मज्ञांनीं एक तिसरा नवीन अंमलबजावणीचा कायदा पसार केला. त्रयो वर्णा ब्राह्मणस्य वशे वर्तेरन्, तेषां ब्राह्मणो धर्म यद् ब्रूयात् तद् राजा चानुतिष्ठेत् ( वसिष्ठ ). म्हणजे ब्राह्मणांनीं सर्व वर्णांना वर्ण व वृत्ति एतत्संबंधक धर्म सांगावा आणि राजानें त्याची अंमलबजावणी करावी. ह्या कायद्यानें, नवीन ज्या सहा जाति बौद्धक्रांतिकालांत उत्पन्न झाल्या त्यांना, ब्राह्मणांनीं निरनिरा-

ल्या विशिष्ट वृत्या म्हणजे धंदे लावून दिले. धर्मानें जी ज्या जातीला वृत्ति सांगितली ती वृत्ति त्या जाती हून अन्य जातीनें करूं नये, असा मनु प्रचलित होऊन, वृत्तिसंकर व तज्जन्य स्पर्धा व वैषम्य ह्यांना जागा च राहिली नाहीं. जाति म्हणून ज्या म्हणतात त्यांचा उदय हिंदुसमाजांत बौद्धक्रांतिकालीं हा असा झाला. शूद्रसमावेश करून घेऊन चातुर्वर्ण्याची स्थापना उत्तरकुरूंत त्रैवर्णिकांनीं केली आणि शूद्रस्त्रीविवाहाचें नियमन मातृसावर्ण्याच्या कायद्यानें करून चातुर्वर्णिकांनीं जगभर गाजणारी जातिसंस्था नर्मदोत्तरप्रदेशांत बुद्धकालीं निर्माण केली. दोन्हीं संस्थांचे अगदीं पहिले उगम कोठें, केव्हां व काय कारणा स्तव सुरू झाले त्याचा छडा बिनचूक लागल्या मुळें, आतां ह्या संस्थां कडे आगापिच्छा कळत नाहीं म्हणून आश्चर्यचकित मुद्रेनें पहाण्याचें स्वल्प हि कारण उरलें नाहीं. ह्या दोन्हीं संस्था पूर्णपणें ऐतिहासिक काळांतल्या आहेत. वसिष्ठा पासून भृगुसंहिताकारा पर्यंतचे सर्व धर्मशास्त्रकार ज्या अनुलोमप्रातिलोम जातींची यादी देतात ती यादी बव्हंशानें काल्पनिक असावी असा संशय कित्येक अर्धवट लोकांनीं दाखविलेला आहे. परंतु त्यांत काडीचा हि अर्थ नाहीं. ह्या जातींचा मागमूस प्रांतोप्रांतीं अद्याप हि आढळतो. उदाहरणार्थ, ब्राह्मण व क्षत्रिया यांच्या पासून झालेल्या मूर्धावसिक्त ऊर्फ ब्राह्मणजातीय या जातीला सध्यां खानदेशांत ब्राह्मणजाई या प्राकृत नांवानें ओळखतात आणि ब्राह्मण व शूद्रा यांच्या पासून झालेल्या पारशव जातीला खानदेशांत पारसई हें प्राकृत नांव आहे. बाणभट्टानें हर्षचरित्रांत आपल्या पारशव भ्रात्याचा उल्लेख केलेला सर्वप्रसिद्ध च आहे.

८२ एणें प्रमाणें सर्व चातुर्वर्णिक समाज, तदन्तर्गत पोटजाति निर्मून, आपल्या कह्यांत पूर्णपणें आणण्याची योजना व अंमलबजावणी केल्या वर, व्रात्य व धर्मभ्रष्ट शूद्र, वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण यांनीं भरलेल्या जैनबौद्ध पाखंडांशीं दीर्घकालीन झगडा करण्याला त्रैवर्णिक सज्ज झाले. झगडा शकपूर्व सहाशें पासून शकोत्तर चारशें पर्यंत तब्बल एक हजार वर्षे चालून, शेवटीं बौद्ध पाखंड नरम होत होत शकोत्तर एक हजाराच्या सुमारास ह्या देशांतून समूळ उध्वस्त झालें. शकपूर्व सहाशें पासून शकोत्तर चारशें पर्यंतच्या हजार वर्षांत प्रथमारंभीं शैशुनाग क्षत्रियांचा पाडाव होऊन साम्राज्यसत्ता जेव्हां शूद्रवर्णी नंदांच्या हातीं गेली, तेव्हां ब्राह्मणसंस्कृतीची फार दैना झाली. नंतर वृषल मौर्यांच्या अमदानींत बौद्धमताला अशोक मौर्याचा पाठिंबा मिळून त्या मताचा प्रसार अफगानिस्ताना पासून सिंहलद्वीपा पर्यंत होऊन, ब्राह्मणधर्म अत्यंत संकोच पावला. पुढें शुंग क्षत्रिय व काण्वायन ब्राह्मण सम्राटांच्या राजवटींत ब्राह्मणधर्माची बूज बरी च सावरते न सावरते तों कनिष्क शकाच्या अमदानींत बौद्ध-

धर्मानें पुनः उचल खालली. परंतु, शकांचा मोड शातवाहनांच्या हस्तें होऊन ब्राह्मणधर्मानें पुनः वर डोकें काढलें व गुप्तांच्या कारकीर्दींत बौद्धधर्मा वर पूर्ण विजय मिळविला. बौद्धधर्माच्या वर्धमानदशेंत व्रात्यांच्या व शूद्रांच्या प्राकृत भाषांना सहज च उत्तेजन मिळालें. परंतु गुप्तांच्या कारकीर्दींत ब्राह्मणधर्माचा विजय झाल्या वर, ब्राह्मणांची संस्कृत भाषा व यज्ञयाग ह्यांची समाजांत पुनः स्थापना झाली. असा हा झगडा एक सारखा एक हजार वर्षं चालला होता. सदर झगडा चालला असतां थोडक्यांत व स्वल्पांत निर्वाणा प्रत नेणाऱ्या बौद्धमता पासून सामान्य जनांना परावृत्त करण्या करितां ब्राह्मणांनीं भागवत-धर्माचा सोपा उपासनामार्ग ऊर्फ भक्तिमार्ग काढिला व स्त्रीशूद्रांना मोक्षपंथा सुलभ करून दिला. तीन हि वर्णांच्या स्त्रिया शूद्रां इतक्या प्राकृत झाल्या मुळें त्यांना संस्कृत व वैदिक भाषांतील यज्ञमार्ग समजण्यास व आचरण्यास अवघड पडे, करतां हा नवीन भक्तिमार्ग काढिला गेला. भगवद्गीतेंत शूद्रां बरोबर स्त्रियांची गणना ग्रंथकारानें जी केली तिचें कारण स्त्रियांची ही अपकृष्ट दशा होय. ज्यांना कोणत्या हि कारणानें वेदमंत्रांचा लाभ मिळण्या सारखा नव्हता, परंतु जे जैनबौद्धादि मतां पासून दूर राहिले होते, अश्या त्रैवर्णिकां करितां पांच-रात्रादि आगमांची हि रचना या च कालीं झाली. वेद, शास्त्रें, धर्म, इति-हास, इत्यादि गहन विषयांत गति करण्यास ज्यांना सवड नव्हती त्यांच्या करितां महाभारतादि सोप्या इतिहासग्रंथांचें प्रणयन ह्या च कालांत झालें. ह्या सोप्या विश्वकोशानें सामान्य जनांस आर्य ऐतिह्याची व परंपरेची ओळख होण्यास मदत केली. ह्या च कालांत महायानपंथांतील देवालयें, विहार, मूर्ति इत्यादींशीं टक्कर देण्यास त्रैवर्णिकांनीं राम, कृष्ण, इत्यादि ऐतिहासिक व्यक्तींना देवत्व देऊन व शिव, विष्णु, इंद्र, सूर्य, वायु, मरुत्, लक्ष्मी, इत्यादि आर्ष देवांना मूर्तत्व देऊन त्यांचीं भव्य व रमणीय देवालयें उभारिलीं. ह्या च कालांत लोकांना धर्म कळावा एतदर्थ मानवधर्मशास्त्र, याज्ञवल्क्यस्मृति, इत्यादि नामांकित कायद्यांचे ग्रंथ निर्माण झाले. ह्या च अवधींत बौद्धजैन पांडित्याला दिपवून टाकणारे ब्रह्मसूत्रें, न्यायसूत्रें, तर्कसूत्रें, मिमांसासूत्रें, भक्तिसूत्रें, वगैरे सूत्रग्रंथ उदयास आले. असे नाना प्रयत्न ह्या विपत्तिकालांत हि ब्राह्मण-प्रमुख चातुर्वर्णिकांनीं नाना दिशांनीं करून, आर्यसंस्कृतीचा पगडा बौद्धजैनादि पाखंडां वर बसविला. बौद्धजैनसंस्कृतींत ज्या अहिंसा भक्ति, इत्यादि घेण्या सारख्या उत्तम वस्तु होत्या त्यांचें परिशिलन ब्राह्मणांनीं बौद्धजैनां हून हि जास्त केलें, ही त्यांत विशेष कौतुकाची कथा आहे. सध्यां तर अहिंसेचा कंठरवानें पुकारा करणाऱ्या बौद्धधर्माचीं अनुयायी सर्व राष्ट्रें मांसा वर उपजीवि-का करणारीं आहेत आणि यज्ञकर्मांत हिंसा करावी म्हणून प्रतिपादणाऱ्या

वैदिकधर्माचीं अनुयायी हिंदू राष्ट्रें मांसाशना पासून आस्तेआस्ते पराङ्मुख होत आहेत.

८३ बौद्धक्रांतीच्या कालांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, स्त्रिया, व संकर यांच्या स्थितीची पाणिनिकालीन ब्राह्मणादींच्या स्थितीशीं आतां तुलना करूं. पाणिनिकालीं पितृसावर्ण्याची म्हणजे कोणत्या हि वर्णांतील स्त्रीच्या पोटीं वरिष्ठ वर्णांतील पुरुषाच्या द्वारा जी संतति होई ती पित्याच्या वर्णाची समजण्याची चाल असल्या मुळें ब्राह्मणादिवर्णांत शूद्रादिवर्णांची भेसळ होत असे. ती भेसळ मातृसावर्ण्याचा कायदा पसार झाल्या मुळें बौद्धक्रांतिकाळांत बंद झाली. ह्या काळांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे वर्ण लखोटबंद होऊन जाती झाले व मिश्रविवाहोत्पन्न प्रजेच्या हि नाना लखोटबंद जाती झाल्या. क्षत्रियांच्या हातचें साम्राज्य जाऊन तें असत् शूद्रांच्या हातीं गेलें. सत् शूद्रवर्णाला चातुर्वर्ण्यांत कायमचें स्थान मिळालें. न शूद्राय मतिं दद्यात् नोच्छिष्टं न हविष्कृतं । न चास्योपदिशेद् धर्मं न चास्य व्रतं आदिशेत् ( वसिष्ठ ) ॥ हा प्रकार जाऊन, शूद्रवर्णः चतुर्थोपि वर्णत्वाद् धर्मं अर्हति । ( व्याससंहिता ) हा न्यायाचा प्रकार आस्तेआस्ते सुरू झाला. पितृसावर्ण्याच्या काळीं शूद्रस्त्रीच्या द्वारा ब्राह्मणाच्या घरांत शूद्राला अप्रत्यक्ष रीतीनें शिरण्याचा चोरटा मान मिळत असे. तो आतां बंद होऊन वर्णान्तर्गत म्हणून कांहीं धर्म शूद्राला हक्कानें प्राप्त झाले. ब्राह्मणादींच्या घरांत शूद्रस्त्रिया शिरल्या मुळें त्रैवर्णिक स्त्रियांची उच्च योग्यता अपकृष्ट झाली व त्यांची किंमत शूद्रींच्या मापानें होऊं लागली. पाणिनिकालीं शूद्रस्त्रियांना त्रैवर्णिकांच्या घरांत भार्यात्वानें रहातां येत असल्या मुळें तदुत्पन्न प्रजा त्रैवर्णिकांत मोडून जाई. पाणिनी नंतर शूद्रस्त्रियांशीं विवाह करणें बेकायदेशीर फर्माविलें गेल्या मुळें, त्यांच्या पासून बेकायदा होणाऱ्या संततीच्या निराळ्या जाती झाल्या आणि अनेक अनुलोम व प्रतिलोम संकरजाती व संकरसंकरजाती अस्तित्वांत आल्या. पितृसावर्ण्याच्या पद्धतीनें भयंकर बौद्धक्रांति जन्मास आली. मातृसावर्ण्याच्या पद्धतीनें लखोटबंद जाती अस्तित्वांत येऊन कांहीं काल चातुर्वर्णिक समाजांत कोणती हि चलबिचल किंवा उलटापालट होण्याचें थांबलें. त्या मुळें त्रैवर्णिकांना बौद्धादि पाखंडांशीं एकतानतेनें झगडण्यास अवकाश मिळाला.

८४ चातुर्वर्णिकांनीं आपल्या घराचा यद्यपि हा असा कडेकोट बंदोबस्त केला तत्रापि जैनबौद्धांच्या करामतीनें व सनातनधर्मी व पाखंडी यांच्या मधील यादवीनें धार्मिक व राजकीय व सामाजिक असा भयंकर उत्पात सुरू होऊन, देशांत अस्वास्थ्य माजलें. ब्राह्मणांचें पुढारपण सावित्रीपतित व्रात्य कबूल करीतनासे झाले व शुद्ध क्षत्रियांचा हुकूम धर्मलंड शूद्र मानीनातसे झाले. आर्यस्त्रिया शूद्रास्त्रि-

यांच्या पंगतीस जाऊन बसल्या आणि बिडालवृत्तीनीं संन्याश्यांचें सोंग घेतलें. दुष्ट ब्राह्मण अयाज्ययाजन करूं लागले आणि निषादस्थपतींच्या इष्टया करण्यांत ऋत्विजांना भूषण वाटूं लागलें. त्यांत महापद्म नंद हा शूद्र सम्राट् सत्क्षत्रियांचा केवळ संहार करण्यास उद्युक्त झाला ( विष्णुपुराण ). अश्या अराजक, अधार्मिक व असत्य राज्यांत व राष्ट्रांत रहाण्यांत शोभा नाहीं हें उत्कटत्वानें ज्यांच्या प्रत्ययास आलें अशा नर्मदोत्तरप्रदेशांतील अनेक चातुर्वर्णिकांनीं दक्षिणारण्यांत वसाहती करण्याच्या निमित्तानें देशान्तर केलें. त्या देशान्तर करणाऱ्या लोकांचा तपशील "महाराष्ट्राचा वसाहत काल" या लेखांत बारकाईनें दिला आहे. पैकीं प्रस्तुत प्रकरणाला उपयोगी म्हणून महरट्ट ऊर्फ माहाराष्ट्रिक लोकां संबंधानें येथें किंचित् जास्त तपशील देतों. " महाराष्ट्राचा वसाहतकाल " या लेखांत वसाहत करण्यास महरट्टांना कोणतीं कारणें प्रोत्साहक झालीं असावीं या बाबी संबंधानें तर्क करतांना अनेक संभाव्य कारणांचें परिसंख्यान करून शेवटीं असा निर्णय दिला होता कीं नर्मदोत्तरप्रदेशांतील राजकर्तृक वगैरे जुलमाला कंटाळून माहाराष्ट्रिकांनीं देशान्तर केलें असावें. तो निर्णय प्रस्तुत विवेचनानें समर्थित होतो. महरट्ट लोक महापद्मादि दुष्ट शूद्र राजांच्या, जैनबौद्धादि पाखंडांच्या व व्रात्यशूद्रादि उत्पथांच्या जुलमाला कंटाळून स्वधर्म, स्वराज्य, व स्ववृत्तियांचा अनुभव घेण्यास दक्षिणारण्यांत बौद्धकालाच्या प्रथमज्वानींत म्हणजे शक पूर्व सहाशेंच्या सुमारास वसाहती करण्यास शिरले.

८५ हे महरट्ट ऊर्फ माहाराष्ट्रिक लोक कोण, या बाबीचा प्रपंच " महाराष्ट्राचा वसाहतकाल " या लेखांत कांहीं केला आहे. महाराजाठञ् ह्या सूत्रांत पाणिनि सांगतो कीं महाराज हा ज्यांच्या भक्तीचा विषय त्यांना माहाराजिक म्हणतात. महाराज म्हणजे कोण? महाराज ह्या शब्दाचे पाणिनिकालीं दोन अर्थ होते. महाराज म्हणजे इंद्र व महाराज म्हणजे केवळ सामान्य राजां हून जो मोठा राजा तो. पैकीं पहिला अर्थ घेतला तर माहाराजिक हे लोक इंद्राचे भक्त ठरतात. आणि दुसरा अर्थ घेतला तर महाराजसंज्ञक किंवा महाराजपदवीधर भूपतींचे जे भक्त ते माहाराजिक ठरतात. माहाराजिक शब्दाचे दोन्ही अर्थ घेतले, तत्रापि माहाराजिक शब्दाचा माहाराष्ट्रिक शब्दाशीं संबंध काय, हा प्रश्न रहातो च. हा प्रश्न असा सोडवितां येतो. राजा ज्या भूमी वर राज्य करतो त्या भूमीला राष्ट्र म्हणत आणि राष्ट्र हें ज्यांच्या भक्तीचा विषय त्यांना राष्ट्रिक म्हणत. त्या प्रमाणें च महाराजा ज्या भूमी वर माहाराज्य करी त्या भूमीला महाराष्ट्र म्हणत आणि महाराष्ट्र हें ज्यांच्या भक्तीचा विषय त्यांना माहाराष्ट्रिक म्हणत. महाराजा हा ज्यांच्या भक्तीचा विषय त्यांना माहाराजिक म्हणत व महाराजाचें महाराष्ट्र तें ज्यांच्या भक्तीचा विषय

त्यांना माहाराष्ट्रिक म्हणत. तात्पर्य, महाराज या व्यक्तीच्या अनुलक्षानें माहाराजिक हा शब्द व महाराष्ट्र या देशाच्या अनुलक्षानें महाराष्ट्रिक हा शब्द असे. हे दोन्ही शब्द वस्तुतः एकार्थक आहेत. एणें प्रमाणें माहाराजिक ते च माहाराष्ट्रिक, हीं बाब निश्चित झाल्या वर, आतां दुसरा असा प्रश्न निघतो कीं दक्षिणारण्यांत वसाहत करण्यास जेव्हां माहाराष्ट्रिक लोक निघाले तेव्हां उत्तरहिंदुस्थानांत महाराजपदवी धारण करणारे कोण भूपति होते व महाराष्ट्र हें नांव ज्याला साजेल असा कोणता देश होता ? सांगावयाला नको च कीं असा देश म्हणजे त्या काळीं मगध होता. प्रद्योत, शैशुनाग, नंद व मौर्य ह्यांनीं एका पाठीमागून एक जें माहाराज्य केलें तें मगधांत केलें. माहाराज्य म्हणजे काय ? त्या कालीं एकछत्री सत्तेला माहाराज्य म्हणत. ऐतरेय ब्राह्मणांत ( ३८।३९ अध्याय ) साम्राज्य, भौज्य, स्वाराज्य, वैराज्य, पारमेष्ठ्य, राज्य, माहाराज्य, आधिपत्य, स्वावश्य, आतिष्ठय व एकराज्य, असे अकरा प्रकारचे नरपति ख्यापिले आहेत. मगधांतील भूपति एकछत्र ऊर्फ एकराट् होते, म्हणजे राज्य, साम्राज्य, माहाराज्य इत्यादी दहा प्रकारच्या सत्ता भोगणाऱ्यांहून श्रेष्ठ होते. तेव्हां ते महाराज होते हें सिद्ध च आहे. ह्या मगधदेशाधिपति महाराजांचे जे भक्त ते माहाराष्ट्रिक म्हणून स्वतःला म्हणत आणि दक्षिणारण्यांत वसाहती जेव्हां ह्यांनीं केल्या तेव्हां माहाराष्ट्रिक अशी ह्यांची प्रख्या सहज च झाली.

८६ मगधांतील माहाराष्ट्रिक लोक बौद्धक्रांतीला कंटाळून ज्या प्रमाणें दक्षिणारण्यांत शिरले त्या च प्रमाणें राष्ट्रिक ह्या नांवाचे हि दुसरे लोक त्या कालीं दक्षिणेंत उतरले. हे राष्ट्रिक लोक म्हणजे अशोक आपल्या शिलालेखांत ज्यांना रास्टिक म्हणतो ते. राष्ट्रिक लोक मगधांतले नव्हत. ह्या लोकांचा देश ज्याला कुरुपांचाल म्हणत तो. तात्पर्य, राष्ट्रिक निराळे व माहाराष्ट्रिक निराळे. ऐतरेयब्राह्मणाच्या अडतिसाव्या अध्यायांत खालील वाक्य आलें आहे.

> " एतामेव देवानां विहितिं अन्वथैनं अस्यां
> ध्रुवायां मध्यमायां प्रतिष्ठायां दिशि
> साध्या श्चाप्त्या श्च देवा षड्भि श्चैव
> पंचविंशै रहोभिः अभ्यषिंचन् एतेन
> च तृचेन एतेन च यजुषा एताभि श्च
> व्याहृतिभी राज्याय, तस्माद् अस्यां
> ध्रुवायां मध्यमायां प्रतिष्ठायां दिशि ये
> के च कुरुपांचालानां राजानः सवशोशीनराणां

राज्याय एव ते अभिषिंच्यन्ते राजेत्येनान्
अभिषिक्तान् आचक्षते ”

भारतवर्षाच्या पूर्व पश्चिम दक्षिण व उत्तर ह्या दिशांच्या मध्यें असणाऱ्या कुरुपांचालांतील नरपतींना राजा हा किताब असतो असा वरील वाक्याचा मुख्य अभिप्राय आहे. अर्थात् ह्या कुरुपांचालांतील राजांच्या राज्याला राष्ट्र हीं विशिष्ट संज्ञा असे व त्या राष्ट्राचे जे भक्त त्यांना राष्ट्रिक हें विशिष्ट अभिधान असे. अशोक माहाराष्ट्रिकांचें नांव काढीत नाहीं, राष्ट्रिकांचें काढतो. त्या वरून दिसतें कीं राष्ट्रिक हे त्याच्या अंमला खालीं होते आणि माहाराष्ट्रिक नव्हते. तात्पर्य, राष्ट्रिक हे माहाराष्ट्रिकां हून निराळे लोक होते.

८७ बौद्धक्रांतिकालांत आणीक तिसरे लोक दक्षिणारण्यांत वसाहती करण्यास आले. त्यांचें नांव वैराष्ट्रिक. हे लोक विराट् नामक राजांच्या देशांतले म्हणजे उत्तरकुरु व उत्तरमद्र या देशांतले रहिवाशी ऊर्फ जनपद होत. विराज हें ज्या राजांचें नांव त्याच्या राज्याला विराष्ट्र म्हणत व विराष्ट्रा वर भक्ति करणारे जे लोक त्यांना वैराष्ट्रिक म्हणत.

८८ असे हे तीन प्रकारचे व तीन देशांतले लोक महाराष्ट्रांत बौद्धक्रांतिकालीं वसाहती करण्यास उतरले. पैकीं, माहाराष्ट्रिकांनीं नर्मदे पासून भीमे पर्यंतचा सह्याद्रिकिनारा व देवगिरी पासून पैठणप्रांता पर्यंतचा देशभाग व्यापिला. महरट्टांचे उल्लेख नाशिक, जुन्नर, कान्हेरी, इत्यादि प्रांतांतील शिलालेखांत सांपडतात. वैराष्ट्रिक लोकांनीं पुण्याच्या दक्षिणेस सध्यां ज्याला वायदेश म्हणतात त्याच्या आसपासचा विस्तीर्ण मुलूख आक्रमण केला. वाईप्रांताला विराटदेश म्हणण्याची चाल माहात्म्यांतून व दंतकथांतून असलेली आढळते. खुद्द वाई शहराला विराटनगरी आणि जवळील किल्ल्याला विराटगड ऊर्फ वैराटगड हीं नांवें अद्याप हि प्रचलित आहेत. पांडवांनीं अज्ञातवासाचीं बारा वर्षे ज्या देशांत काढिलीं तो विराटदेश हा च होय, अशी लौकिक समजूत आहे. परंतु तींत विशेष तथ्य नाहीं, हें सांगावयाला नको. वैराटगड ऊर्फ वैराडगड हा शब्द वैराष्ट्रिक गड ह्या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. असें दिसतें कीं, वैराष्ट्रिक लोकांनीं ह्या गडा वर वसाहतकालीं ठाणें देऊन भोंवतालील प्रांतां वर अंमल केला आणि गडाला आपलें नांव दिलें. कदाचित् उत्तरकर्नाटकांतील बेरड हे लढवय्ये लोक वैराष्ट्रिकांचे ( वैराष्ट्रिक=बेरट्ट=बेरड ) वंशज असावे असा मला संशय येतो. राष्ट्रिक लोकांनीं सध्यां ज्याला दक्षिण महाराष्ट्र म्हणतात तो प्रांत व निजामच्या राज्यांतील बीड पासून म्हैसूरजवळील सौंदत्ती वगैरे प्रांता पर्यंतचा सर्व मुलूख आटोपिला. रट्टांच्या ऊर्फ राष्ट्रिकांच्या नांवा

वरून रट्टपाटी, रट्टगिरि, रट्टपळ्ळी, रट्टेहल्ली, रट्टज्जुन (राष्ट्रकार्जुनकं), रट्टी, रेडी, इत्यादि किती तरी गांवांचीं, प्रांतांचीं, व्यक्तींचीं व जातींचीं नांवें महशूर आहेत. तात्पर्य, माहाराष्ट्रिक उत्तरेस, वैराष्ट्रिक मध्यभागीं आणि राष्ट्रिक दक्षिणभागीं दंडकारण्यांत वसाहत करते झाले. कालान्तरानें उत्तरे कडील माहाराष्ट्रिकांचें प्राबल्य व प्राधान्य सर्वां हून अधिकतम होऊन, ह्या सर्वांना माहाराष्ट्रिक ही एक च संज्ञा लागू झाली व तिघांचे तीन देश मिळून त्रिमहाराष्ट्रक असें त्रिकलिंग, त्रिगर्त, त्रिकूट, त्रिपुर, ह्या नांवाच्या धर्तीचें नांव पडलें. ह्या त्रिमहाराष्ट्रक देशांत शकाच्या सहाव्या शतकांत नव्याण्णव हजार गांवें होतीं म्हणून ताम्रपटांत लिहिलेलें आढळतें तें अक्षरशः खरें आहे. खानदेश, नाशिक, अहमदनगर, पुणें, सातारा, सोलापूर, बेळगांव, धारवाड, विजापूर, कारवार, रत्नागिरि, कुलाबा, ठाणें, मिळून सुमारें चाळीस हजार गांवें आहेत. ह्यांत औरंगाबाद, बीड, बेदर, नांदेड वगैरे निजामच्या राज्याचा मराठवाडा मिळविला व म्हैसूरचा उत्तरभाग मिळविला म्हणजे नव्याण्णव हजारांची संख्या सहज होईल. त्यांत एवढें मात्र लक्ष्यांत घेतलें पाहिजे कीं सध्यां सुमार चतुर्थांश गांवठाणें ओसाड आहेत. सध्यां पंचाहत्तर हजार ग्रामसंख्या भरली म्हणजे सहाव्या शतकांतील नव्याण्णव हजार संख्या झाली, असा अर्थ घेण्याला कांहीं एक हरकत नाहीं.

८९ राष्ट्रिक, वैराष्ट्रिक व माहाराष्ट्रिक हे लोक मगध, कुरुपांचाल व उत्तरकुरु या नर्मदोत्तर देशांतून दक्षिणेंत आले, या बाबीला प्रत्यंतर पुरावा भाषेचा देतां येतो. माहाराष्ट्रिकां संबंधानें एवढें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं ते यद्यपि मगधदेशीय महाराजांचे म्हणजे अधिपतींचे अनुयायी होते तत्रापि ते मूळचे मगधदेशांतील रहाणारे नव्हत. ते मूळचे हिमालया पलीकडे देवांच्या अनुषंगानें रहाणारे जे देवयोनि व गणदेव त्यां पैकीं होते. त्यांची मूळभाषा वैदिक भाषेच्या समकालीन अशी एक उपभाषा होती व त्यांना माहाराजिक अशी संज्ञा होती. मगधांत आल्या वर मगधदेशांतील प्राकृत जनांच्या भाषेंतील कांहीं लकबा त्यांनीं उचलल्या. वैराष्ट्रिक हे हि मूळचे हिमालया पलीकडील लोक होते व ते पंजाबांतील मत्स्यदेशांत विराटराजांचे पुढें राष्ट्रिक बनले. राष्ट्रिक हे लोक कुरुपांचालांतील होते व ते आपली भाषा घेऊन दक्षिणेंत उतरले. वैराष्ट्रिकांची भाषा जीस अपभ्रंश म्हणून म्हणत ती होती व राष्ट्रिकांची भाषा जीस पुढें सौरसेनी म्हणून नांव पडलें ती होती. असे हे तीन लोक आपापल्या भाषा घेऊन दक्षिणेंत उतरले. वसाहतकारांत वजनानें व कर्तबगारीनें माहाराष्ट्रिक लोक सर्वांहून वरचढ असल्या मुळें त्यांच्या भाषे पुढें इतरांच्या भाषा फिक्या पडल्या; तत्रापि त्यांच्या भाषांतील कांहीं

लकबा माहाराष्ट्रिकांच्या भाषेला चिकटल्या शिवाय राहिल्या नाहींत. वैराष्ट्रिकांच्या, राष्ट्रिकांच्या व मगधांच्या भाषांच्या माहाराष्ट्रिकांच्या महाराष्ट्री भाषेवर परिणाम होऊन त्या पासून काय फल झालें तें उदाहरणार्थ कित्येक शब्द देऊन स्पष्ट करतों. संस्कृत रत्न या शब्दाचें महाराष्ट्रांत रूप रअण होतें. परंतु महाराष्ट्री पासून निघालेल्या मराठींत लेणें असें रूप प्रचलित आहे. येथें असा प्रश्न येतो कीं, रत्न शब्दांतला संस्कृत र चा र च ठेवणारी महाराष्ट्री मराठी होतांना र चा ल काय म्हणून करते? प्रश्नाला उत्तर असें. मागधींत संस्कृत र च्या स्थानीं ल नियमानें होई, इतक्या नियमानें कीं र हा उच्चार च मुळीं मागधींत नव्हता. सबब, संस्कृत रत्न शब्दांतील र च्या स्थानीं मागधी ल उच्चार करी. महाराष्ट्रीची मराठी होतांना मगधांतील लोकांच्या संगतीनें रअण हा उच्चार लअण=लयण=लइण=लेणें असा मराठींत लकारयुक्त झाला. लयन ( रहाण्याची जागा ) पासून निघालेला लेणें हा मराठी शब्द रत्न पासून निघालेल्या लेणें या शब्दा हून निराळा, हें लक्ष्यांत ठेवावें. संस्कृत ष चा महाराष्ट्रींत स किंवा ह होतो. विषय=विसअ. परंतु, मराठींत विषये ह्या सप्तम्यंत शब्दाच्या ऐवजीं विशीं असा उच्चार येतो. महाराष्ट्री स च्या ऐवजीं मराठींत हा श कसा आला? तर, मागधींत स व ष हे उच्चार च मुळीं नाहींत. माहाराष्ट्रींतून मराठींत येतांना विसअम्मि या रूपांतील स चा श मागधी भाषा बोलणाऱ्यांच्या संगतीनें झाला हें उघड आहे. सध्यां मराठींत हंसी=हंशी, माउस्सिआ=माउशी, असा—अश्यास, ठसा—ठश्यास, पास—पाशीं, फास—फाशीं, इत्यादि ठिकाणीं जो शकार शिष्टांच्या बोलण्यांत येतो तो आणि सामान्य लोकांच्या बोलण्यांत ष च्या ऐवजीं जो श ऐकूं येतो तो हे दोन्ही ठिकाणचे श महाराष्ट्रीची मराठी होतांना मागधीची जी संगती लागली तिचीं चिन्हें आहेत. य मुळें श उच्चार होतो, वगैरे कारणें वरवरचीं केवळ साहचर्य दाखविणारीं विधानें होत, उच्चाराच्या बदलाचीं खरीं कारणें नव्हत. महाराष्ट्री मराठीचें रूप घेत असतां, मागधीचा तिच्या वर जो परिणाम झाला त्याचीं अशीं आणीक शेकडों उदाहरणें देतां येतील. त्यां वरून महाराष्ट्रिक लोक एके काळीं मगधदेशांत वसती करून होते या विधानाला पोषक असें एक भाषिक कारण उपलब्ध होतें. राष्ट्रिकांची जी सौरसेनी भाषा तिचा हि महाराष्ट्री वर परिणाम झालेला आहे, हें मराठी वरून ताडितां येतें. महाराष्ट्रींत सर्वस्माद् व्यंजनात् परः पूर्वस्थ श्च रेफो लोप्यो भवति ( चंड ). परंतु सौरसेनींत तसा प्रकार होतो च असें नाहीं. उदाहरणार्थ, सौरसेनींत मूर्ख चा अपभ्रंश विकल्पानें मुरुक्ख असा होतो, र चा लोप होत नाहीं. महाराष्ट्रीची मराठी बनतांना मुरुक्ख या रूपाचा अपभ्रंश मुलूख

असा होऊन, मुल्ख असा शब्द निष्पन्न झाला व तो " तो साऱ्या मुलखाचा शहाणा आहे " ह्या मराठींत आढळतो. येथें मुलखाचा म्हणजे मूर्खाणाम् असा अर्थ आहे, मुल्ख म्हणजे प्रांत असा अर्थ नाहीं. मुल्ख म्हणजे प्रांत हा अरबी शब्द आहे. तो साऱ्या मुलखाचा शहाणा आहे या वाक्याचें शब्दशः संस्कृत भाषांतर स सर्वेषां मूर्खाणां विचक्षणः अस्ति असें आहे. फारसी मुल्ख शब्द या वाक्यांत अभिप्रेत असता तर मुलखांतला असा प्रयोग शक्य होता, मुलखाचा असा चान्त प्रयोग शक्य नव्हता. येथें सौरसेनी लकब महाराष्ट्रीनें मराठी बनतांना उचलली हें उघड आहे. महाराष्ट्रींत व सौरसेनींत विशेष व उत्कट अंतर नसल्या मुळें दक्षिणारण्यांत त्या दोघींचा मिलाफ होण्यास फारश्या यातना पडल्या नाहींत. महाराष्ट्री मराठी होत असतांना अपभ्रंशाच्या ज्या कित्येक लकबा तिनें उचलल्या त्यां पैकीं एकींचा येथें उल्लेख करितों. अपभ्रंशे अधो रेफस्य लोपो न भवति म्हणून चंड सांगतो. महाराष्ट्रींत अधो–रेफाचा लोप होतो. व्याघ्रः हा शब्द अपभ्रंशांत, म्हणजे चंडकालीन अपभ्रंशांत, वाघ्रो असा होत असे. मराठींत माहाराष्ट्रींतून आलेलें वाघ असें रूप असून, शिवाय अपभ्रंशाच्या संगतीनें अधोरेफयुक्त वाघ्र् असें रूप अशिष्ट व ग्राम्य जनांत आढळतें. तात्पर्य, महाराष्ट्री भाषा ही जरी मराठीची मुख्य जननी आहे तरी तिनें अधूनमधून सौरसेनी, मागधी, अपभ्रंश व पैशाची या दायांचें दूध चाखिलें आहे. आणि ह्याचें विशेष आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. माहाराष्ट्रिक, राष्ट्रिक व वैराष्ट्रिक हे लोक मगध, कुरु, पांचाल, मत्स्य व उत्तरकुरु इत्यादि उत्तरेकडील देशांतून दक्षिणेंत आले असल्या मुळें त्या त्या देशांतील भाषांच्या लकबा माहाराष्ट्री मराठी होत असतांना तिच्या आंगवळणी पडाव्या हें साहाजिक आहे. शिष्ट मराठी खेरीज महाराष्ट्रांत सध्यां ज्या प्रांतिक व जातिक उपभाषा आहेत त्या उत्तरेकडून वसाहत करण्यास आलेल्या त्या त्या उत्तरप्रांतीय जातींच्या भाषां पासून निघालेल्या आहेत, हें त्या त्या प्रांतिक व जातिक उपभाषांच्या विशिष्ट लकबां वरून ओळखतां येतें.

९० माहाराष्ट्रिक, राष्ट्रिक व वैराष्ट्रिक लोक उत्तरेकडील देशांतून आले या बाबीला दुसरा प्रत्यंतर पुरावा माहाराष्ट्रिकादि लोकांच्या पुरोहितांच्या शाखा व गोत्रें ऊर्फ आडनांवें यांच्या मध्यें सांपडतो. माहाराष्ट्रिकादि लोक वैदिकधर्मी पडल्या मुळें, यज्ञयागार्थ त्यांनीं आपले पुरोहित हि आपल्या बरोबर वसाहतींत आणिले. सध्यां महाराष्ट्रांत नागपूर, वऱ्हाड, खानदेश, नाशिक, औरंगाबाद, बीड, सातारा, वगैरे प्रांतांत यजुर्वेदी ब्राह्मणांची संख्या बहुतम आहे, त्यांच्या खालोखाल ऋग्वेद्यांचा भरणा आहे आणि त्याच्या खालीं काण्व,

मैत्रायणीय, इत्यादि शाखांची वसती आहे. सामवेदी व अथर्ववेदी ब्राह्मण महाराष्ट्रांत हाताच्या बोटां वर मोजण्या इतके असतील नसतील. माहाराष्ट्रिकादि लोक मगध, कुरु, पांचाल, मत्स्य, उत्तरकुरु व उत्तरमद्र या देशांतून आले, तेव्हां त्यांचे पुरोहित हि त्या च देशांतून आले असले पाहिजेत हें सांगणें नलगे. करतां नर्मदोत्तर प्रदेशांत सध्यां कोणत्या शाखांच्या ब्राह्मणांचा भरणा कोणत्या देशांत विशेष आहे तें पाहूं. त्या त्या प्रांतांत त्या त्या शाखा पुरातनकाला पासून अभिजन आहेत असें धरून ही पहाणी करावयाची आहे. काश्मीर हा अर्वाचीन देश म्हणजे ऐतरेयब्राह्मणकालीन उत्तरकुरु व उत्तरमद्र ह्या देशांचा दक्षिण भाग आहे. ह्या देशांतील ब्राह्मण कृष्णयजुर्वेदी, कठशाखी व लौगाक्षिसूत्री आहेत. ह्यांच्यांत जीं आडनांवें सध्यां प्रचलित आहेत त्यां पैकीं कांहीं तत्सदृश मराठी आडनांवां सह देतोंः--

| | काश्मिरी | मराठी | | काश्मिरी | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| १ | भैरव | बेहरे | ९ | छात्री | छत्रे |
| २ | भूत | भुते | १० | बास | व्यास |
| ३ | त्रकारी | टकारे | ११ | वारिकी | वारके |
| ४ | वैष्णव | वैष्णव | १२ | डुली | डुले |
| ५ | भट | भट | १३ | पांडे | पांडे |
| ६ | राख्यस | राक्षे | १४ | विचारी | विचारे |
| ७ | काली | काळे | १५ | चंद्र | चंद्रे |
| ८ | बंगी | बंगी | | | |

सध्यांचा पंजाब म्हणजे प्राचीन मत्स्यदेशाचा कांहीं भाग. त्यांतील सर्व सारस्वत ब्राह्मण शुक्लयजुर्वेदी व माध्यंदिनशाखी आहेत. त्यांचीं कांहीं आडनांवें येणें प्रमाणेंः—

| | | |
|---|---|---|
| १ नवले | १० भारद्वाजी | १९ नागे |
| २ रवडे | ११ जोशीं | २० वसिष्ठ |
| ३ पंडित | १२ दत्त | २१ भारथे |
| ४ तिखे | १३ वैद्य | २२ ऋषि |
| ५ बागे | १४ श्यामे | २३ ब्रह्मी |
| ६ मालिये | १५ कटपळे | २४ भिंडे |
| ७ काळिये | १६ घोटके | २५ भूत |
| ८ कपूरिये | १७ पराशर | २६ ओझे |
| ९ पाठक | १८ कपाल | २७ पाध्ये |

| | | |
|---|---|---|
| २८ तोटे | ३९ तगाले | ५० मुंडे |
| २९ मढेर | ४० दीक्षित | ५१ उपाध्ये |
| ३० भटारे | ४१ आचारिये | ५२ घोडे |
| ३१ व्यास | ४२ डोकरे | ५३ गुहालिये |
| ३२ मैत्र | ४३ केसर | ५४ सिरखंडिये |
| ३३ लट्टू | ४४ लाट | ५५ किरले |
| ३४ अग्निहोत्री | ४५ प्रोहित | ५६ गोसाई |
| ३५ कोटपाल | ४६ बलिये | ५७ गोकुलिये |
| ३६ सुंदर | ४७ सुखे | ५८ कवडे |
| ३७ पांडे | ४८ मुरे | ५९ रोड |
| ३८ गांडे | ४९ सांगड | ६० जड |

वरील यादींतील पंजाबी सारस्वत ब्राह्मणांच्या नांवांशीं तत्सदृश माहाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या नांवांची समान्तर याद वाचकांना सहज सुचण्या सारखी असल्या मुळें ती येथें देत नाहीं. सिंधप्रांतांतील ब्राह्मण शुक्लयजुर्वेदी व माध्यंदिनशाखी आहेत. कान्यकुब्जांतील मिश्रब्राह्मणां पैकीं बहुतेक शुक्लयजुर्वेदी व काण्व-शाखी आहेत, आणि थोडे ऋग्वेदी आहेत. त्यांच्यांत गर्ग, अवस्थि, बाला, गौतमो, तारा, करयव, इत्यादि आडनांवें आहेत. कान्यकुब्जांतील डुबे ब्राह्मण बहुतेक शुक्लयजुर्वेदी, काण्वशाखी व गोभिलसूत्री असून, कांहीं थोडे सामवेदी आहेत. त्या च देशांतील पाठक ब्राह्मण यजुर्वेदी आहेत. तसें च तेथील चोबे व दीक्षित ब्राह्मण यजुर्वेदी माध्यंदिन आहेत. रजपुतान्यांतील पोखर सेवग ब्राह्मण, जयपुरांतील पारिख ब्राह्मण, मारवाडांतील दायिम ब्राह्मण, सर्व यजुर्वेदी माध्यंदिन आहेत. मैथिल ब्राह्मणां पैकीं ओझे किंवा झा ब्राह्मण माध्यंदिन आहेत. व मिश्र ब्राह्मण यजुर्वेदी व सामवेदी असे दोन वेदांचे आहेत. नेपाळांतील ब्राह्मण यजुर्वेदी असून त्यांच्यांत भट्ट, आचार्य, पर्वत्य, अधिकारी, पंडित, इत्यादि आडनांवें आहेत. गुर्जर ब्राह्मण ऋग्यजुःसाम असे तीनवेदी आहेत. वंग ब्राह्मणांत सामवेदी फार. कलिंग ब्राह्मण शुक्लयजुर्वेदी काण्व असून, ओड्र देशांतील नंद ब्राह्मण हि शुक्लयजुर्वेदी आहेत. हे नंदब्राह्मण शातवाहनांच्या वेळीं पैठणास आले. ह्या नंदब्राह्मणांची नंदभाषा हि त्यांज बरोबर माहाराष्ट्रांत आली. हे नंदब्राह्मण प्रतिष्ठानीं सराफी करून असत. ह्या यादी वरून स्पष्ट च झालें कीं काश्मीर पासून मगध पर्यंतचा सर्व मुलूख शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन ब्राह्मणानीं भरलेला असून, त्यांत ऋग्वेदी व सामवेदी ब्राह्मणांची तुरळक वसती आहे व काण्वांची हि थोडी-बहुत संख्या आहे. हे माध्यंदिन, काण्व व ऋग्वेदी ब्राह्मण माहाराष्ट्रिक,

राष्ट्रिक व वैराष्ट्रिक क्षत्रियां बरोबर दक्षिणेंत आले. पैकीं विदर्भांत यजुर्वेदी माध्यंदिन ब्राह्मण बाहुल्यानें आहेत. ह्यांचा उल्लेख त्रिविक्रमभट्टानें शतपथिनः म्हणून नलदमयंतीचंपूंत केला आहे. नागपूरप्रांतीं झाडे ब्राह्मण माध्यंदिनशाखी व काण्वशाखी असे दोन्ही शाखांचे आहेत. खानदेश, नाशिक, पंढरपूर, इकडे हि माध्यंदिन ब्राह्मण सडकून आहेत. तात्पर्य, माहाराष्ट्रांत शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन ब्राह्मणांची संख्या सर्वांहून जास्त आहे. ऋग्वेदी, काण्व व आपस्तंब ह्यांच्या अल्प संख्येची तुलना माध्यंदिनांच्या प्रचंड संख्येशीं केली म्हणजे माहाराष्ट्र हा देश भूरित्वानें माध्यंदिनांचा आहे, असें म्हणणें भाग पडतें. माध्यंदिनांत काण्वांची भर टाकिली म्हणजे ही शुक्लयजुर्वेद्यांची संख्या त्याहून हि मोठी होत्ये. शुक्लयजुर्वेद्यांच्या वाजसनेयी संहितेचा मूळ उत्पादक याज्ञवल्क्य असल्या मुळें, तत्प्रणीत धर्मादिसूत्रें त्यांनीं महाराष्ट्रांत वसाहतकाळीं आणिलीं. दक्षिणेंत याज्ञवल्क्यस्मृति प्रमाण धरतात त्याचें मुख्य कारण, महाराष्ट्रांतील शुक्लयजुर्वेदी ब्राह्मणांची बहुतम संख्या व ह्या ब्राह्मणांचे अनुयायी जे माहाराष्ट्रिकादि क्षत्रिय त्यांची संख्या वाजसनेय शाखेची अनुयायी आहे, हें आहे. येणें प्रमाणें भाषेच्या प्रमाणा वरून व वेदशाखांच्या प्रमाणां वरून निश्चित झालें कीं माहाराष्ट्रिकादि लोक व त्यांचे वाजसनेयादि पुरोहित काश्मीर पासून मगध पर्यंतच्या उत्तरहिंदुस्थानांतील देशांतून बौद्धक्रांतिकालांत दक्षिणेंत उतरले.

९१ उत्तरहिंदुस्थानांतून बौद्धक्रांतिकालीं माहाराष्ट्रिकादि लोकां बरोबर आणीक हि कांहीं लोक दक्षिणेंत उतरले. त्यांचीं नांवें अशोकानें आपल्या शिलालेखांत दिलीं आहेत. ते लोक म्हणजे भोज, पेतेनिक, सतियपुत, केरलपुत, पांड्य व चोल हे होत. पैकीं भोज म्हणजे ऐतरेयब्राह्मणाच्या अडतिसाव्या अध्यायांत "दक्षिणस्यां दिशि ये के च सत्वतां राजानो भौज्यायैव ते अभिषिच्यंते भोजेति एनान् अभिषिक्तान् आचक्षते" म्हणून ज्यांचें वर्णन केलें आहे ते लोक होत. कुरुपांचालाच्या दक्षिणेस जो मथुरा प्रांत आहे तो ह्या सत्वत् लोकांच्या भोज नांवाच्या राजांचा देश होय. हे भोज लोक दक्षिणापथांतील विदर्भदेशांत वसाहत करून राहिले. म्हणजे विदर्भांतील भोज लोक मथुरावृंदावना कडील उत्तरहिंदुस्थानांतील लोक होत हें स्पष्ट झालें. ह्या संस्कृत भोज शब्दाला स्वार्थक ल प्रत्यय लागून मराठी भोजले—भोसले हा सुप्रसिद्ध शब्द झाला. पेतेनिक म्हणजे प्रतिष्ठानक लोक मूळचे प्रयागाच्या समोरील जुनाट प्रतिष्ठान शहरचे व प्रांतांतले रहाणारे लोक. प्रयागा जवळच्या प्रतिष्ठान प्रांतांतील ह्या लोकांनीं दक्षिणेंत गोदावरी– तीरीं येऊन प्रतिष्ठान ऊर्फ पैठाण हा प्रांत व शहर स्थापून ह्या शहरांत व प्रांतांत वसति

केली. म्हणजे हे प्रतिष्ठानक हि लोक उत्तरहिंदुस्थानांतील होत. सतियपुत म्हणजे सत्वत्पुत्र. मधुरावृंदावनप्रांतांतील भोज हे ज्या सत्वत् लोकांचे राजे त्या सत्वत् लोकां पासून सत्वत्पुत्रांची ऊर्फ सतियपुतांची उत्पत्ति झाली. ह्या सतियपुतांची वसति सांवतवाडी म्हणजे सत्वद्वाटिका प्रांतांत होती. एवंच, हे सतियपुत हि उत्तरे कडील च लोक होत. सतियपुतां प्रमाणें च केरलपुत हि उत्तरे कडून च मलबारांत कोंकणां तून उतरले. कुरुदेशाच्या उत्तरेस अतिनिकट कुलिंद देश होता त्याच्या शेजारीं केरल देश प्राचीनकाळीं होता. केरलदेशच्या सुधार्मिक राजाचा पुत्र जो चंद्रहास त्याची कथा आबालवृद्धांस महशूर आहे. ह्या उत्तरहिंदुस्थानांतील केरलदेशांतून निघून केरलपुत ह्या लोकांनीं दक्षिणेंत मलबारकिनाऱ्या वर वसाहत केली व त्या वसाहतीला केरल हें नांव दिलें. केरलां प्रमाणें च चोल हे उत्तरे कडील लोक होते. पैशाची भाषेच्या एका पोटभेदाला चूलिकापैशाची असें नांव आहे. ह्या सामासिक शब्दांतील चूलिका हा शब्द निःसंशय देशवाचक आहे. ह्या उत्तरे कडील चूलिका देशांतील चौल ऊर्फ प्राकृत चोल, चोळ लोकांनीं दक्षिणेंत वसति करून आपल्या वसाहतीला चोल हें अभिधान दिलें. पांड्य हे उत्तरहिंदुस्थानांतील कुरुदेशा शेजारील पांडुराष्ट्रांतील पांडु लोकांचे वंशज होत. कात्यायन पांडो र्ड्यण् ह्या वार्तिकांत ह्या पांडुदेशाचा उद्धार करतो. पांडुराष्ट्रांतील पांडुलोकांचे वंशज जे पांड्य त्यांनीं दक्षिणेंत येऊन वसाहत केली व त्या वसाहतीला पांड्य हें नांव दिलें. पांड्य, चोल, केरल, सत्वत्पुत्र, भोज, पेतो, निक वगैरे लोकांच्या हकीकतीशीं सध्यां आपणास कांहीं कर्तव्य नाहीं. फक्त-राष्ट्रिक हें पद ज्यांच्या नांवांत येतें त्या राष्ट्रिक, वैराष्ट्रिक व विशेषतः माहाराष्ट्रिक लोकां संबंधानें आपणास येथें विचार कर्तव्य आहे.

९२ ह्या माहाराष्ट्रिक लोकांना माहाराष्ट्रक हि म्हणत व असें दिसतें कीं माहाराष्ट्र हि म्हणत. राष्ट्रिक, वैराष्ट्रिक ह्या लोकांत वजनानें व कर्तबगारीनें माहाराष्ट्र लोक प्रमुख असल्या मुळें, " स एषां ग्रामणीः " ह्या सूत्रांत सांगितलेल्या रिवाजा प्रमाणें ह्या साऱ्यांना माहाराष्ट्रक अशी संज्ञा कालान्तरानें प्रचलित झाली. माहाराष्ट्रिकांना माहाराष्ट्रिन् असें हि नांव असे. माहाराष्ट्रिन् या शब्दाचें स्त्रीलिंगी रूप माहाराष्ट्रिणी. माहाराष्ट्रिणी ह्या संस्कृत शब्दाचें प्राकृत रूप महारठिणी भाजें, बेडसें व कार्लें येथील कांहीं शिलालेखांत येतें. तात्पर्य, माहाराष्ट्र, माहाराष्ट्रक, माहाराष्ट्रिक व महाराष्ट्रिन् अश्या चार तऱ्हांनीं ह्या लोकांच्या नांवाचा उच्चार होत असे. ह्यांच्या महाराष्ट्रिन् या नांवा वरून ह्यांच्या स्त्रियांना जसें महाराष्ट्रिणी, महारठिणी हें नांव पडलें, तसें च ह्यांच्या माहाराष्ट्र या नांवा वरून ह्यांच्या भाषेला माहाराष्ट्री असें प्रथम नांव पडलें. माहाराष्ट्री ह्या संस्कृत शब्दाच

अपभ्रंश महरट्टी असा होऊन त्याचें पुनः संस्कृतीकरण महाराष्ट्री असें झालें. महाराष्ट्री असा उच्चार सर्व प्राकृत वैय्याकरण निरपवाद देतात. महाराष्ट्री भाषा बोलणारे हे माहाराष्ट्रिक लोक बौद्धक्रांतिकालीं जेव्हां दक्षिणेंत उतरलें तेव्हां ह्यांची संस्कृति कोणत्या दर्जाची होती तें आतां पाहूं. ह्यांच्या संस्कृतीचें परीक्षण राजकीय दृष्ट्या, समाजदृष्ट्या व भाषादृष्ट्या अश्या तीन दृष्टयांनीं करता येण्यास साधनें आहेत. महरट्ट ऊर्फ माहाराष्ट्रिक लोक चातुर्वर्ण्यबद्ध असून, पुरोहितां खेरीज त्यांचें एक पाऊल हि पुढें पडत नसे. झल्ल, मल्ल, निच्छिवि, नट, इत्यादींच्या सारखे ते सावित्रीपतित व्रात्य हि झालेले नव्हते व ओड्र, द्रविड, कांबोज, इत्यादींच्या प्रमाणें ब्राह्मणादर्शनानें ते शूद्र हि बनले नव्हते. उत्तर हिंदुस्थानांतील व्रात्य व शूद्रप्राय अश्या पाखंडमतानुयायी क्षत्रियांच्या जुलमाला कंटाळून ते दक्षिणेंत आले होते. मातृसावर्ण्याचा कायदा पसार होण्याच्या पूर्वीं त्यांच्यांत शूद्रभार्योत्पन्न निकृष्ट क्षत्रियांची भरती इतर वर्णांच्या प्रमाणें च होऊन गेलेली होती; ती तो कायदा पसार झाल्या वर कायदेशीर रीतीनें बंद झाली. परंतु बेकायदेशीर रीतीनें चालू असली तत्रापि त्या बेकायदेशीर संबंधा पासून होणाऱ्या प्रजेच्या पृथक् जाति बनूं लागल्या मुळें शुद्ध क्षत्रियत्वाला त्या पासून बट्टा लागण्याचा संभव नव्हता. माहाराष्ट्रिक आपली उपजीविका मगधांत आयुधां वरती करित म्हणजे ते आयुधोपजीवी ऊर्फ शस्त्रोपजीवी संघ होते. मगधांतील महाराजांचे ते गण होते म्हणजे भाडोत्री सैनिक होते. ह्या शस्त्रोपजीवी संघांत मूळ अशी चाल होती कीं गणांतील सर्व स्त्रिया गणांतलि सर्व पुरुषांना सामान्य असत व ह्या गणांतील स्त्रियांना गणिका म्हणत. गणिका म्हणजे विश्वयोषिता, हा अर्वाचीन अर्थ एथें घ्यावयाचा नाहीं. गणिका म्हणजे गणांतील सर्वांना सामान्य असणाऱ्या सर्व स्त्रिया एवढा च अर्थ येथें विवक्षित आहे. ह्या गणांतील गणांनीं गणांतील स्त्रियांशीं केलेल्या प्रणयाविषींचीं वर्णनें गाथासप्तशतींत आलेलीं आहेत. त्यां वरून स्पष्ट दिसतें कीं ह्या गणसंघांत स्त्रियांचें दांपत्यनियमन विशेष दृढ नसून, बरें च सैल होतें. ह्या स्त्रीपुरुषसंबंधाच्या बाबींत मगधांतील जे महाराजशब्दधारी क्षत्रिय त्यांच्या हून हे माहाराष्ट्रिक गण बरे च प्राचीन म्हणजे मागसलेले होते. तत्रापि मगधांतील शिष्ट क्षत्रियांच्या व ब्राह्मणांच्या सान्निध्यानें त्यांच्यांतील स्त्रीपुरुषसंबंधांतील हें शैथिल्य आस्तेआस्ते क्षय पावून वैयक्तिक पतिपत्नीत्वाची चाल त्यांच्यांत रुजत होती. माहाराष्ट्रिक लोक मुळचे इंद्र, अग्नि, इत्यादींचे भक्त असून, बौद्धकालीं जेव्हां शिव, विष्णु, इत्यादि देवतांची स्थापना ब्राह्मणांनीं केली तेव्हां ह्या नवीन देवांचे हि ते भक्त बनले. माहाराष्ट्रिकांची सामाजिक, धार्मिक व कौटुंबिक स्थिति ही अशी प्राथमावस्थिक होती.

त्यांची राजकीय घटना हि ह्या प्राथमिक अवस्थे हून फारशी दूर नव्हती. मगधांत व मगधाच्या जवळील चेदि वगैरे प्रांतांत असतांना, झल्ल, मल्ल, निच्छिवि, शाक्य, नट, इत्यादि व्रात्यांच्यांतल्या प्रमाणें च ह्यांच्यांत हि गण म्हणून जी राजकीय संस्था ती प्रचलित होती. ह्या गणनामक राजकीय संस्थेंत गणांतील सर्व च पुरुषव्यक्ति राजे असत व सर्व व्यक्ति आपणास राजा ह्या पदानें भूषवीत. सध्यां शहाण्णव कुळांतील सर्व मराठे आपणास व्यक्तिशः राजे म्हणवितात त्याचें कारण त्यांच्या प्राचीन पूर्वजांतील ही गणराज्याची संस्था होय. गणराज्य तीन प्रकारचें असें. एका प्रकारांत गणां तील सर्व व्यक्ति अधिकार चालवीत. ह्या प्रकाराला बहुनायकी गणराज्य म्हटलें असतां चालेल. दुसऱ्या प्रकारांत कांहीं प्रमुख व्यक्तींच्या हातीं राज्याधिकार सोंपविलेला असे. ह्याला महाजनकी गणराज्य हें नांव शोभण्या सारखें आहे. आणि तिसऱ्या प्रकारांत एका सर्वश्रेष्ठ व्यक्तीला सर्वाधिकारी करीत. ह्याला एकराज्य म्हणणें रास्त आहे. हे तिन्ही प्रकार माहाराष्ट्रिक लोकांत प्रचलित होते. आणि हे तिन्ही प्रकार घेऊन माहाराष्ट्रिक दक्षिणेंत उतरले. आंध्रभृत्यकालीं ही गणसंस्था माहाराष्ट्रिकांत होती. नाणेघाटांतील आंध्रभृत्यांच्या भित्तिचित्रां तील एका चित्रा खालील महारठिगनकयिरो हीं अक्षरें सुप्रसिद्ध आहेत. माहाराष्ट्रिकगणकवीरः या सामासिक पदांत एकनायकी गणराज्या पेक्षां बहुनायकी गणराज्याचा ध्वनि ऐकूं येतो. समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद येथील स्तंभा वर व्याघ्रराज, नीलराज, कुबेर, मंटराज, इत्यादि राजांचीं नांवें आलीं आहेत, तीं जर माहाराष्ट्रिकांची असतील तर त्या वरून दिसतें कीं शालिवाहनाच्या तिसऱ्या चवथ्या शतकांत दक्षिणेंत एकनायकी गणराज्यें बनून गेलीं होतीं व बहुनायकी गणराज्यें अस्तास गेलीं होतीं. तात्पर्य, शकोत्तर चारशें पर्यंत माहाराष्ट्रिकांत गणराज्यसंस्था, एकनायकी किंवा बहुनायकी, प्रचलित होती. ही गणराज्यसंस्था माहाराष्ट्रिकांनीं नवीन शोधून काढून प्रचलित केली असा समज करून घेण्याचें कारण नाहीं. ही संस्था माहाराष्ट्रिक जेव्हां माहाराजिक होते तेव्हां पासून त्यांच्यांत प्रचलित होती. देवयोनि व गणदेवता यांच्यांत गणराज्यसंस्था फार प्राचीन काळा पासून विद्यमान होती. तसें च प्राचीन ऋषीं मध्यें हि ही संस्था अस्तित्वांत होती. ही गणराज्यसंस्था इतकी प्राचीन आहे कीं ऋग्वेदकालीन ऋषींनीं हिचें हृदयंगम वर्णन केलें आहे. ऋग्वेदाच्या दुसऱ्या मंडळांत ब्रह्मणस्पतीचीं सूक्तें ऊर्फ सुवर्णनें दिलीं आहेत त्यांत गणसंस्थेचा राजा जो गणराज ऊर्फ ब्रह्मणस्पति त्याच्या सामर्थ्याचें कीर्तन केलेलें आहे. गणानां त्वा गणपतिं हा मंत्र विख्यात आहे. संस्कारादिकार्यांत प्रथमतः गणपतीचें आवाहन या मंत्रानें याज्ञिक करतात. परंतु, ह्या मंत्रांत

कोणाचें व कशाचें वर्णन आहे एतद्विषयीं त्यांच्या कल्पना विचित्र आहेत. त्यांच्या च तेवढ्या कल्पना विचित्र आहेत असें नव्हे, तर सायणाच्या हि कल्पन अश्या च विचित्र आहेत. हे लोक ब्रह्मणस्पतीला देव समजतात. वस्तुतः ब्रह्मणस्पति म्हणजे ब्रह्मन् यांचा मुख्य पुढारी असा अर्थ ऋग्वेदकालीं म्हणजे हें ब्राह्मणस्पत्य सूक्त मूळ रचिलें गेलें त्या काळीं होता. अंत्योदात्त ब्रह्मन् ( पुं. ) शब्दाचा अर्थ स्तुति करणारा, स्तावक असा आहे व आद्योदात्त ब्रह्मन् ( नपुं. ) शब्दाचा अर्थ स्तुति, स्तवन असा आहे. आद्योदात्त ब्रह्मन् शब्द घेतला, तर ब्रह्मणस्पति या शब्दाचा अर्थ स्तुतीचा पति असा होतो. ह्या अर्था पासून कांहीं बोध होत नसल्या मुळें, सायणानें ब्रह्मन् ( नपुं. ) ह्या शब्दाचा अन्न असा अर्थ निघंटू तून घेतला व ब्रह्मणस्पति म्हणजे अन्नाचा पालन करणारा असा अर्थ केला. असा कांहीं तरी अर्थ केल्या वांचून त्याला गत्यंतर नव्हतें असें मात्र म्हणतां येत नाहीं. ब्रह्मणस्पते ह्या संबोधनांत सर्व पदें अनुदात्त आहेत. तेव्हां ब्रह्मणस्पते या संबोधनांत ब्रह्मणः हें पद अंत्योदात्त किंवा आद्योदात्त असें वाटेल तसें घेतां आलें असतें. परंतु येथें परंपरागत संहितापाठ व स्वरप्रक्रिया त्याच्या आड आली. ब्रह्मणस्पति ह्या सामासिक शब्दांतील दोन्हीं पदें आद्योदात्त आहेत असें स्वरप्रक्रिया सांगते. तेव्हां आद्योदात्त ब्रह्मन् शब्द स्वीकारून त्याचा अर्थ स्तुति किंवा अन्न करण्या खेरीज दुसरी तोड सायणाला सुचण्या सारखी नव्हती. संहिता ज्यांनीं संपादिली ते लोक व संहिता प्रमाण धरून ज्यांनीं स्वरप्रक्रिया रचिली ते वैयाकरण मूळ ऋग्वेदरचनाकाळा पासून अत्यन्त दूर पडल्या कारणानें ह्या ऋचेंतील ब्रह्मणां ह्या पदाचे व ब्रह्मणस्पति ह्या सामासिक शब्दाचे स्वर देण्यास चुकले असतील, असा संशय सायणाला येणें शक्य नव्हतें. परंतु, संस्थाचे इतिहास जाणणारे आधुनिक जे आपण त्यांना असें स्पष्ट दिसत आहे कीं ह्या ऋचें तील ब्रह्मणां हें पद अंत्योदात्त आहे व ब्रह्मन् हा शब्द ब्रह्मणां व ब्रह्मणस्पते या दोन्ही स्थलीं पुल्लिंगी आहे. एणें प्रमाणें ब्रह्मन् हा शब्द पुल्लिंगी घेतला म्हणजे ह्या ऋचेचा अन्वय व अर्थ असा लागतो :—

### ऋचा

गणानां त्वा गणपतिं हवामहे कविं कवीनां उपमश्रवस्तमम् ॥
ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पते आ नः शृण्वन्न् ऊतिभिः सीद सादनम् ॥१॥

### अन्वय

ब्रह्मणस्पते ! गणानां गणपतिं, कवीनां कविं, उपमश्रवस्तमं,

ब्रह्मणां ज्येष्ठराजं त्वा हवामहे । नः शृण्वन् ऊतिभिः सादनं आसीद ।

### अर्थ

हे स्तावकांच्या पुढाऱ्या ! गणांचा नायक, शहाण्यांचा शहाणा, ज्याचें यश इतरांच्या यशाला अत्यन्त उपमानभूत होतें, स्तावकलोकांचा सर्वश्रेष्ठ राजा, असा जो तूं त्या तुला आम्हीं बोलावितों. आमचें ऐकून, देणग्या सह आसंदी वर विराजमान हो.

ब्रह्मन् लोकांत म्हणजे स्तावक असे जे ऋषि म्हणजे ब्राह्मण त्या लोकांत हें सूक्त रचण्याच्या काळीं गणसंस्था व गणराज्य म्हणून ज्यास म्हणतात ती संस्था विद्यमान होती. ह्या ऋषींच्या म्हणजे ब्राह्मणांच्या गणाच्या पुढाऱ्याला गणपति व ब्रह्मणस्पति अशा संज्ञा रूढ होऊन गेल्या होत्या. गणपति व ब्रह्मणस्पति हे शब्द संज्ञा बनल्या कारणानें, सभेचा सभापति व देशाचा भूपति किंवा गांवचा गावुंडा हे शब्द पुनरुक्तीला न जुमानतां ज्या प्रमाणें सध्यां आपण योजितों त्या प्रमाणें गणानां गणपतिं व ब्रह्मणां ब्रह्मणस्पतिं हे शब्द पुनरुक्तीला न जुमानतां योजिले जात. ह्या ब्रह्मगणांत सर्व व्यक्ति राजशब्दोपजीवी असत. पैकीं सर्वांत वयानें, अनुभवानें, शहाणपणानें व यशस्वी कृत्यांनीं जो ज्येष्ठ त्याला ज्येष्ठराज म्हणत व त्याच्या हुकमती खालीं सारे वागत. प्रायः ज्येष्ठराज सर्व ब्रह्मगणाचा साक्षात् पिता असे ( जनिता ब्रह्मणां असि ). ब्रह्मणस्पतीला दुसरी संज्ञा बृहस्पति म्हणून असे. बृह् धातूला मन् प्रत्यय लागून जसा ब्रह्मन् शब्द होतो तसा च त्या धातूला अस् प्रत्यय लागून बृहस् शब्द त्या च अर्थानें होई. बृहस् म्हणजे स्तावक, स्तुति करणारा. बृहस्पति ऊर्फ ब्रह्मणस्पति ऊर्फ गणपति ऊर्फ ज्येष्ठराज भीम ( भयंकर ), अमित्रदंभन, रक्षोहण असून तो ज्यांना आपल्या संरक्षणा खालीं घेई ( यं रक्षसि ब्रह्मणस्पते ) त्याला संकट शिवत नसे ( न तं अंहो न दुरितं न अरातयः तितिरुः ). तो शत्रूंना जाळणारा ( निष्टपा शत्रुं ), स्वजनांना मार्गांत रक्षण करणारा ( पथिकृत् ) असे. ज्याला ज्याला म्हणून गणपतीचें साहाय्य मिळे ( यं यं युजं कृणुते ब्रह्मणस्पतिः ) तो तो शत्रूंचा विध्वंस करतो ( वनुष्यतः वनवत् ). जो ब्रह्मणस्पतीला तुपाचीं पक्कान्नें नेऊन देतो ( यो अस्मै हव्यैः घृतवद्भिः अविधत् ) त्याला तो पूर्वेकडील देशांत विजयानें वसाहत करण्यास नेतो ( तं प्राचा प्र नयति ). तात्पर्य, गणांच्या पुढाऱ्याचा महिमा या सूक्तांत कवीनें वर्णिलेला आहे. गणसंस्था व गणराज्य ज्या ब्रह्मगणांत रूढ झालें होतें त्यांच्यांत अशी चाल होती

कीं गणांतील सर्व स्त्रिया गणपती कडून प्रजोत्पादन करून घेण्यांत भूषण मानीत. एतत्संबंधानें यजुर्वेदाच्या वाजसनेयसंहितेचा तेविसावा अध्याय पहावा. त्यांत गणांच्या गणपतीला स्त्रिया एणें प्रमाणें आव्हान करतात :—

### यजुः

गणानां त्वा गणपतिं हवामहे
प्रियाणां त्वा प्रियपतिं हवामहे
निधीनां त्वा निधिपतिं हवामहे
वसो मम
आहं अजानि गर्भधम्
आ त्वं अजासि गर्भधम्

### अर्थ

हे आमच्या गणांच्या पुढाऱ्या! तुला आम्ही बोलावितों,
हे आमच्या प्रियांच्या प्रिय पुढाऱ्या! तुला आम्हीं बोलावितों,
हे आमच्या ठेव्यांच्या मुख्य ठेव्या! तुला आम्हीं बोलावितों,
हे माझ्या वसू!
मी आपलें घबाड हलवितें किंवा ओढत्यें,
तूं आपलें घबाड हलव किंवा ओढ.

गर्भध=घबाड म्हणजे गर्भ धारण करण्याचा अवयव. गणपतिअथर्वशीर्षांत गणांच्या पुढाऱ्याचें रूप वर्णिलेलें आहे. गणांचा हा लढाऊ पुढारी हातांत पाश, अंकुश व हत्तीचा एक दात हीं शस्त्रें घेऊन व तांबडीं वस्त्रें लेऊन, शत्रूंचा धुव्वा उडवून देई. असा हा ब्रह्मन् लोकांचा ऊर्फ ऋषींचा पुढारी जो ब्रह्मणस्पति ऊर्फ गणपति तो असे. त्याची आराधना प्रथम केल्या वांचून गणांतील गणांचें कोणतें हि कृत्य निर्विघ्नपणें तडीस जाण्याचा संभव नसे. सबब, कोणतें हि लहानमोठें कृत्य करावयाच्या प्रारंभीं गणाच्या पुढाऱ्याचें साहाय्य प्रथम मिळवावें लागे. गणपतीचें आवाहन करण्याच्या ह्या प्राचीन चालीचें आपण सध्यां नुसतें नाटकी अनुकरण करतों, परंतु प्राचीन काळीं जेव्हां गणराज्यसंस्था ब्रह्मन् लोकांत प्रचलित होती तेव्हां गणाच्या प्रत्यक्ष पुढाऱ्याची कोणत्या हि कृत्याला संमति घ्यावी लागे. अशी हि प्राचीन गणराज्यसंस्था माहाराष्ट्रिक ऊर्फ महरट्ट लोकांत प्रचलित होती. राज्य करण्याची ही अगदीं प्राथमिक पद्धति माहाराष्ट्रिक लोकांत असल्या मुळें, ते जेव्हां दंडकारण्यांत

वसाहती करण्यास आले, तेव्हां त्यांनीं नागपूर पासून तुंगभद्रे पर्यंतच्या प्रांतांत अक्षरशः हजारों चिमकुलीं चिमकुलीं अशीं गणराज्यें स्थापिलीं. बहुतेक प्रत्येक तर्फेला म्हणजे दहावीस मैल लांबीच्या प्रदेशाला एकेक गणराज्य असून, तेथील मुख्य राजधानीच्या गांवाला राजपुरी, राजुरी, रायरी, राजगड, रायगड, अशीं नांवें असत. महाराष्ट्रांत राजपुऱ्या, राजुऱ्या, रायऱ्या, इत्यादि राज हें आद्याक्षर असणारीं जीं अनेक गांवें सांपडतात त्याचें कारण महरट्टांची ही प्राथमावस्थिक गणराज्यसंस्था होय. माहाराष्ट्रिकांची राजकीय स्थिति ज्या प्रमाणें अगदीं प्राथमावस्थिक होती त्या च प्रमाणें त्यांची भाषा जी महाराष्ट्री ती हि तितकी च प्राथमावस्थिक होती. संस्कृतांत जसें व्याकरण, धर्म, न्याय, मीमांसा, इतिहास, इत्यादि शास्त्रांत विपुल व भव्य वाङ्मय त्या कालीं होतें, तसें भव्य व विपुल वाङ्मय महाराष्ट्री भाषेंत असण्याचा संभव सुद्धां नव्हता. माहाराष्ट्रिक लोक दक्षिणेंत बौद्धक्रांतिकालीं जेव्हां उतरले तेव्हां त्यांचें वाङ्मय लौकिक स्त्रीपुरुषप्रणयविषयक लावण्यांच्या स्वरूपाचें असून, तें अद्याप अक्षरनिविष्ट हि झालें नव्हतें, फक्त माहाराष्ट्रिक जनतेच्या तोंडीं होतें.

९३ उत्तरहिंदुस्थानांतील तत्कालीन उच्च क्षत्रियां हून व उच्च अशोकादि राज्यकर्त्या वृषलांहून सुधारणेच्या बऱ्याच खालच्या पायरी वर असलेल्या ह्या माहाराष्ट्रिक गणांची बौद्धक्रांतिकालीं अशी ही सामाजिक, राजकीय व भाषिक हालहवाल होती. दक्षिणेंत वसाहती करून राहिल्या वर ह्यांच्या सामाजिक, राजकीय व भाषिक स्थितींत काय फेरबदल झाले त्याचें आतां वर्णन करावयाचें. पैकीं राजकीय स्थिति प्रथम घेऊं. आपापल्या गणा पुरतीं लहानशीं गणराज्यें चालविण्या इतकी च ऐपत असल्यामुळें, ह्यांच्या हून वरिष्ठदर्ज्याच्या राज्यपद्धति ज्यांच्या आंगवळणी पडल्या होत्या अश्या उत्तरे कडील व पूर्वे कडील जास्त सुधारलेल्या लोकांच्या अंमला खालीं ह्या लोकांना शकपूर्व १००पासून शकोत्तर १५५१ पर्यंत म्हणजे सोळाशें वर्षें रखडावें लागलें. कनिष्ठ संस्कृतीच्या लोकांना वरिष्ठ सस्कृतीच्या लोकांच्या अंमला खालीं असें च रखडावें लागतें. प्रथम ह्या गणराजां वर अशोकादिमौर्यांचा अंमल बसावयाचा. परंतु, इतरत्र अडचणी आल्या मुळें, मौर्यांना ह्यांच्या प्रांतां कडे लक्ष्य देण्यास सवड झाली नाहीं. ती सवड आंध्रदेशांतील आंध्रभृत्यांना झाली. शकपूर्व १५० पासून शकोत्तर १५० पर्यंत ह्यांच्या वर आंध्रभृत्यांनीं राज्य केलें. नंतर दोन अडीच शें वर्षें म्हणजे शक १५० पासून शक ४०० पर्यंत देशांत अधिराज्य असें कोणाचें च नव्हतें. ह्या अनधिराजक काला नंतर शक ४०० पासून शक ६७५ पर्यंत चालुक्यांनीं माहाराष्ट्रिकां वर अधिराज्य केलें. त्या पुढें शक ६७५ पासून शक ८९५ पर्यंतच्या कालांत माहाराष्ट्रिक राष्ट्रकूटांची सेवा करून होते.

तदनंतर शक ८९५ पासून शक ११११ पर्यंत पुनः चालुक्यांचा ग्रह माहाराष्ट्रिकांच्या राशीस बसला. चालुक्यांचा ग्रह शक ११११ त सुटल्या वर शक १२४० पर्यंत यादवांची मगरमिठी माहाराष्ट्रिकांच्या पाठुंगळीस चिकटली. यादवांच्या मगरमिठींतून शक १२४० त मुक्त झाल्या वर नंतर मुसुलमानांनीं माहाराष्ट्रिकां वर जी स्वारी चढविली ती शहाजी राजे भोसले यांच्या हालचाली सुरू होत तों पर्यंत म्हणजे सुमार शक १५५१ पर्यंत चळली नाहीं. एणें प्रमाणें तब्बल सोळाशें वर्षे माहाराष्ट्रिक लोक परक्यांच्या अंमला खालीं होते. आंध्रभृत्य, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, इत्यादि महाराष्ट्रा वरील राज्यकर्त्यांना परकीय म्हटलेलें पाहून वाचकांना आश्चर्य वाटेल. परंतु, वस्तुस्थिती च तशी आहे. आंध्रभृत्य ऊर्फ शातवाहन हे माहाराष्ट्रिक लोकां हून अगदीं भिन्न लोक होते. नाणेघांटांतील भित्तिचित्रांत आंध्रभृत्य राजे महारठिगनकयिरोला आपल्या हून निराळ्या वंशांतला म्हणून स्वच्छ लिहून ठेवतात. आंध्रभृत्य आणि माहाराष्ट्रिक हे जर एका च वंशांतील असते, तर महारठिगणाचा त्यांनीं स्वतंत्र निर्देश केला नसता. आंध्रभृत्य ऊर्फ शातवाहन हे जर माहाराष्ट्रिक नव्हत, तर ते कोण व कोठचे लोक होते ह्या बाबीचा निर्णय करणें अगत्याचें आहे.

आंध्र, आंध्रजातीय, आंध्रभृत्य, शालिवाहन, शाकवाहन, आणि शातवाहन, अश्या सहा संज्ञा आंध्रभृत्य म्हणून जे राजे महाराष्ट्रदेशांत झाले त्या राजांना लावलेल्या पुराणांतून, शिलालेखांतून व संस्कृतग्रंथांतून आढळतात. ह्या संज्ञांचा अर्थ काय! प्रथम शालिवाहन शब्द घेऊं. वाहनं आहितात् ( ८–४–८ ) या सूत्रा प्रमाणें शालिवाहण असें णकारान्त रूप असावयास पाहिजे, परंतु सर्वत्र निरपवाद शालिवाहन असें नकारान्त रूप आढळतें. याचा अर्थ इतका च कीं शालिवाहन हें नकारान्त रूप योजिणारे जे आंध्रभृत्य म्हणून कोणी लोक ते पाणिनिय कालीन शालिवाहण हें शुद्ध म्हणजे संभावित रूप न योजितां, अशुद्ध म्हणजे अशिष्ट शालिवाहन असें नकारान्त रूप योजीत. म्हणजे आंध्रभृत्य हे स्वतःच्या नांवाचा शिष्ट उच्चार न करतां, अशिष्ट उच्चार करीत. अर्थात् सकृद्दर्शनीं असें म्हणावें लागतें कीं आंध्रभृत्य लोक संस्कृत उच्चार करणारे नसून प्राकृत उच्चार करणारे लोक होते. अर्थात्, शालिवाहन हा शब्द व हें नकारान्त उपनाम पाणिनिकाला नंतर प्रचारांत आलें. इतिहासा वरून सिद्ध च आहे कीं शालिवाहन राजे पाणिनि नंतर अनेक शतकांनीं उदयास आले. अपभ्रष्ट उच्चारा वरून हि हीच बाब सिद्ध होत आहे. हें झालें उच्चारा संबंधानें. आतां शालिवाहन या शब्दाचा अर्थ काय तें पाहूं.

वाहनं आहितात् ( ८–४–८ ) या सूत्रा प्रमाणें शालिवाहण हा सामासिक शब्द शालयो वाह्याः यस्मिन् वाहने तत् शालिवाहणम्. साळीचें भात भर-

लेली जी गाडी तिला पाणिनीय कालीं शालिवाहण म्हणत. शालिवाहण हें विशिष्ट चिन्ह ज्यांचें ते शालिवाहण लोक किंवा कुटुंब. कदंब वृक्ष हें ज्यांचें विशिष्ट देवक त्या कुटुंबाचें जसें कदंब हें आडनांव, तसें च शालिवाहण हें विशिष्ट देवक ज्यांचें ते शालिवाहण या कुटुंबाचें आडनांव. शालिवाहण राजांचें शालिवाहण हें देवक असण्याचें कारण असें दिसतें कीं ज्या देशांत हे लोक प्रथम रहात असत तेथें साळीचे तांदूळ हें निर्वाहाचें मुख्य धान्य असे. असा देश म्हटला म्हणजे शालिवाहनांचा आंध्र देश. आंध्रदेशांत खाण्याचें मुख्य धान्य साळीचे तांदूळ अद्याप हि आहेत व पुरातन कालीं हि होते. तात्पर्य, शालिवाहन हें आडनांव धारण करणारें राजघराणें मूळचें आंध्रदेशीय होतें, हें शालिवाहन या शब्दा वरून सिद्ध होतें. इतिहासा वरून व शिलालेखां वरून सर्वप्रसिद्ध च आहे कीं शालिवाहनराजे आंध्रदेशीय होते.

आतां शाकवाहन या शब्दाचा अर्थ करूं. पाणिनीय दृष्ट्या शब्द शाकवाहण असा हवा. ज्या अर्थी शाकवाहन असा पाठ सर्वत्र आढळतो त्या अर्थी शालिवाहन शब्दा वर जी टीका केली ती सर्व या हि शब्दाला लागू पडते. शाकवाहण म्हणजे भाजीची गाडी. विशेषतःआळू वगैरे भाजीची गाडी. आंध्रदेशांतील भात खाणाऱ्या लोकांना आळू वगैरे भाजी हि पुरातनकाला पासून फार आवडत असे असें दिसतें. सबब शालिवाहन आडनांवा इतकें च शाकवाहन हें हि आडनांव आंध्रजातीय राजांच्या एका कुळाला लागलें जावें हें साहजिक आहे. पाणिनीच्या क्तेन नञ्विशिष्टेनानञ् (२–१–६०) या सूत्राला शाकपार्थिवानां सिद्धये उत्तरपदलोपस्योपसख्यानं हें वार्तिक कात्यायन जोडतो. शाकप्रियः पार्थिवः शाकपार्थिवः। भाजी ज्या राजाला विशेष आवडते तो शाकपार्थिव म्हणावा, असें कात्यायन सांगतो. पाणिनीला हा शाकपार्थिव शब्द व अर्थात् अर्थ माहीत नाहीं. कात्यायनकालीं भाजी विशेषतः आळ्वादिकांची भाजी ज्या राजांना प्रिय होती अश्या राजांना शाकपार्थिव ही संज्ञा कात्यायनकालीं सर्वतोमुखी झालेली होती व भाषेंत रूढ होऊन गेली होती, सबब कात्यायनानें हा शाकपार्थिव शब्द नमूद करून ठेविला. इतर कोणी यःकश्चित् माणूस भाजी वर सडकून हात मारणारा असता तर त्याच्या संबंधानें शाकमनुष्यः इत्यादि संज्ञा प्रचलित झाल्या असत्या कीं काय याचा फारसा संशय घ्यावयाला नको. बहुशः अशी संज्ञा सामान्य माणसा संबंधानें प्रचलित होण्यांत विशेष मातब्बरी नसते. राजे वगैरे राष्ट्रांतील अत्यंत प्रमुख लोकांच्या अत्यंत क्षुद्र संवई वर हि जनतेची सूक्ष्म नजर असते व त्या थोर लोकांच्या क्षुद्र लकबांचें हि स्तुतिस्तोत्र किंवा निंदाकुत्सना लोकांच्या भाषणाचा विषय होऊन बसतो. अश्या रीतीनें हा शाकपार्थिव शब्द अस्तित्वांत आलेला आहे. कात्यायनकालीन हे शाकपार्थिव ऊर्फ

भाजीखाऊ म्हणून सर्वतोमुखीं प्रसिद्ध झालेले राजे कोण? ज्या देशांत साळीचें भात खूप पिकतें व जेथील लोक भाताला तोंडीलावणें भाजीचें सडकून घेतात त्या देशांतील हे राजे असावेत. असे देश कात्यायनकालीन म्हटले म्हणजे पूर्वसमुद्रा कडील कलिंग व आंध्र हे देश संभवतात. कलिंगदेशचा राजा खारवेल शकपूर्व २४१ ऊर्फ ख्रिस्तपूर्व १६३ च्या सुमारास झाला. शकपूर्व ४०० च्या सुमारास झालेल्या कात्यायनाच्या कालीं कलिंगदेशांत खारवेलाचें पूर्वज हयात असावेत, किंवा खारवेलाच्या घराण्याच्या पूर्वीच्या घराण्याचें राजे हयात असावेत. ह्या कलिंगांतील म्हणजे त्रिकलिंग किंवा तैलंगदेश म्हणून ज्याला संज्ञा पुढें पडली त्या संयुक्तदेशाच्या एका भागांतील राजांना त्यांच्या नित्याच्या भातभाजीच्या खाण्या वरून विनोदानें शाकपार्थिव हें नांव कात्यायन-कालीं रूढ झालेलें असावें. तसेंच खारवेल या कलिंगराजानें शातकर्णि नांवाच्या आंध्रराजाला जिकल्याचा उल्लेख हत्तिगुंफा येथील लेखांत आलेला आहे. म्हणजे शातकर्णी नांवाचा कोणी आंध्रराजा खारवेलाच्या समकालीन होता. ह्या शातकर्णीचे पूर्वज कोणी तरी राजे आंध्रदेशा वर कात्यायनकालीं हयात असावेत. आंध्रदेशांतील लोक भात व भाजी खाण्या बद्दल प्रसिद्ध आहेत. ही च प्रसिद्धि कात्यायनकालीं तेथील राजांसंबंधानें लोकांत असून विनोदानें त्या राजांना शाकपार्थिव हें नांव सर्वतोमुखीं झालेलें असावें. तात्पर्य, शालि व शाक खाण्या बद्दलची प्रसिद्धि कलिंग व आंध्र या देशांतील राजांची कात्यायनकालीं विशेष होती असें दिसतें. मध्यदेशांतील राजे प्राधान्यानें घीश-कर किंवा डाळरोटी किंवा शिरापुरी खाणारे असून तोंडीलावण्याला भजी किंवा चटणी थोडीशी घेत, आळ्वादींची भाजी किंवा चिंचेचें आंबट कढण किंवा तिखटाची भसकापुरी पाहून त्यांच्या अंगावर कांटा उभा राही. सबब, मध्य-देशांतील राजांचा व आंध्रकलिंगादिदेशांतील राजांचा जेव्हा युद्धादि शत्रुमित्रभाव उत्पन्न झाला, तेव्हां शाकपार्थिव हा वैनोदिक शब्द निर्माण झाला. एणें प्रमाणें शाकपार्थिव हा शब्द विनोदानें शाकवाहन राजांना लावला जाऊं लागला. मूळचें त्यांचें आडनांव शाकवाहन म्हणजे "भाजीची गाडी" हें होतें च. कदाचित् शाकपार्थिव हा समास शाकवाहनपार्थिव असा मूळचा असून, नंतर वाहन या मध्यमपदाचा लोप होऊन शाकपार्थिव असा बनला गेला असल्याचा बहुत संभव आहे. कोणता हि संभव स्वीकारिला, तत्रापि भात व भाजी यां वरून ह्या आंध्रजातीय राजांना शालिवाहन व शाकवाहन हीं आडनांवें पड-लेलीं आहेत यांत संशय नाहीं.

आतां शातवाहन या तकारी शब्दाचा अर्थ लावूं. शाताः वाहनाः येषां ते शातवाहनाः। शात म्हणजे तिखट आणि वाहन म्हणजे बैल किंवा घोडे.

ज्यांचे गाडीचे बैल किंवा घोडे तिखट किंवा चलाख आहेत त्यांना शातवाहन म्हणत. शालिवाहन व शाकवाहन या शब्दांनीं भात व भाजी या पदार्थांशीं संबंध येतो. शातवाहन या शब्दाचा संबंध बैल किंवा घोडे याशीं येतो. मूळचे शातवाहन राजे बैलाच्या गाड्यांनीं आपल्या उदमाचा व्यवहार करीत असावेत, असा अर्थ शातवाहन या शब्दा पासून निघतो. बहुशः हे राजे मूळचे शेतकरी, कुंभार वगैरे असावेत. या राजांच्या अनेक आडनांवांत व विशेषनावांत शातकर्णि हा हि शब्द येतो. शाताः कर्णाः येषां ते शातकर्णाः। कापलेले आहेत ज्यांचे कान असे जे बैल त्यांना शातकर्ण म्हणत. खुणे करतां बैलांचे कान चिरफाडण्याची व कापण्याची चाल सध्यां प्रमाणें च पुरातनकालीं असे. जनावरांच्या कानां वर पांच व आठ ह्या आंकड्यांचे डाग देण्याची चाल ऋग्वेदकाला पासूनची आहे. तशी च जनावरांचे कान खुणे खातर चिरफाडण्याची चाल हि पुरातन असून, शातवाहनराजांच्या खड्डींतलि किंवा गोठ्यांतील किंवा पागेंतलि जनावरांचे कान चिरफाडण्याची चाल असे असें दिसतें. त्या वरून शातकर्णि हें नांव शातवाहनकुलांतील कित्येक राजांना पडलेलें असावें. चिरफाडलेल्या कानांचे बैल ज्यांच्या जवळ आहेत ते शातकर्ण. शातकर्णाचें अपत्य शातकर्णि. ह्या कान कापण्याच्या दृष्टीनें पहातां, शातवाहन शब्द शातकर्णवाहन असा मूळचा धरून, नंतर कर्ण या मध्यमपदाचा लोप करून शातवाहन असा बनला गेला असल्याचा संभव आहे. शातवाहन म्हणजे कापलेले कान ज्यांचे आहेत असे बैल ज्यांचे आहेत ते राजे. हा अर्थ घेतला म्हणजे शात या शब्दाचा तीक्ष्ण, चलाख, हा अर्थ करण्याची जरूरी रहात नाहीं. शातवाहन व शातकर्ण व शातकर्णि या तिन्ही शब्दांचा अर्थ, चिरफाडलेले कान ज्यांचे आहेत असे बैल ज्या राजांजवळ प्रामुख्यानें असत ते राजे, असा होतो व तो सर्वतो प्रकारें समीचीन दिसतो.

शालिवाहन, शाकवाहन, शातकर्णि व शातवाहन, या चार शब्दां वरून खालील बाबी निष्पन्न होतातः—( १ ) आंध्रभृत्य राजे साळींचे तांदूळ खाणारे होते, ( २ ) आळ्वादींच्या भाज्या खाणारे होते, ( ३ ) कलिंग किंवा आंध्र देशांतील मूळचे होते, ( ४ ) त्यांच्या बैलांचे कान खुणे खातर चिरफाडलेले असत, व ( ५ ) मूळचे आंध्रभृत्य राजे शेतकरी, कुंभार, वगैरे खालच्या वर्गा पैकीं होते. शालिवाहन राजाचा कुंभाराशीं असलेला संबंध शालिवाहनाच्या मराठी बखरींत वर्णिलेला सर्वप्रसिद्ध च आहे.

आतां आंध्र, आंध्रजातीय, व आंध्रभृत्य या शब्दांचा अर्थ लावूं. शातवाहन राजे मूळचे पैटणचे पेटेनिक ऊर्फ प्रतिष्ठानकनिवासी नव्हत, मूळचे आंध्रदेशांतील होत, याबद्दल वाद नाहीं. पुराणांतून यांना आंध्र व आंध्रजातीय म्हटलेलें

आहे, तें हि ठीक च आहे. आंध्रदेशांतील फारा दिवसांचे रहिवाशी या दृष्टीनें देशा वरून शातवाहन राजांना आंध्र हें नांव पडावें हें सुयुक्तिक दिसतें. आंध्रदेशांत पुष्कळ दिवस पिढ्यानपिढ्या राहिल्या वरून आंध्र हें नांव यद्यपि पडलें असलें, तत्रापि शातवाहन राजे मूळचे कोणत्या जातीचे होते, या बाबीचा निर्णय तेवढ्या वरून कायमचा होत नाहीं. आंध्र या शब्दाचे दोन अर्थ आहेत. ( १ ) आंध्रदेशांत असलेले जे मूळचे भौम ऊर्फ भूमिज अनार्य आंध्र ते लोक आंध्र या संज्ञेनें ओळखिले जात हा एक अर्थ. आणि आंध्रदेशांत जेते म्हणून वसति करावयाला जे आर्य लोक गेले त्यांचा निवास त्या अनार्य देशांत फार काल झाला म्हणून त्या आर्यांना त्या देशावरून आंध्र हें नांव पडलें, असा दुसरा अर्थ. म्हणजे आंध्रदेशांत ( १ ) आर्य आंध्र व ( २ ) अनार्य आंध्र, असे दोन प्रकारचे लोक असत, अशी निष्पत्ति होत्ये. पैकीं शातवाहन राजे अनार्य आंध्रां पैकीं होते किंवा आर्य आंध्रां पैकीं होते? या शंकेचें निवारण करण्यास एक साधन आहे. यांचीं पांचपंचवीस नांवें पुराणांतून व शिलालेखांतून व नाण्यां वर दिलेलीं उपलब्ध आहेत. हीं नांवें आर्यभाषेंतील आहेत किंवा अनार्यभाषेंतील आहेत? शातवाहनांचीं एकोनएक स्त्रीपुरुषनामें आर्य जी संस्कृत भाषा किंवा प्राकृत भाषा ती पैकीं आहेत. तेव्हां उघड च झालें कीं शातवाहनराजे आर्य आंध्र होते. ते अनार्य आंध्रभाषा बोलत नसत, आर्य प्राकृत भाषा बोलत. आंध्रभृत्यांच्या कारकीर्दींत माहाराष्ट्री नांवाची जी प्राकृत ती अत्यन्त उदयास आली, हें सर्वमान्य आहे. एणें प्रमाणें शातवाहनांना लाविलेल्या आंध्र व आंध्रजातीय या नांवाची उपपत्ति निर्णीत झाली. आतां आंध्रभृत्य या शब्दाचा अर्थ काय तो पाहूं. आंध्रांचे भृत्य ते आंध्रभृत्य, असा उघडउघड समास सोडवितां येतो. एथें असे प्रश्न उद्भवतात कीं ( १ ) ज्यांचे भृत्य शातवाहन राजे होते ते आंध्र कोण?, ( २ ) स्वतः शातवाहन जर आंध्र होते तर त्यां हून निराळे असे हे त्यांचे धनी दुसरे आंध्र कोण?, व ( ३ ) भृत्य या शब्दाचा खरा अर्थ काय? पैकीं तिसरा प्रश्न प्रथम विचारांत घेऊं व तदनुषंगानें इतर दोन्ही प्रश्नांचा निर्वाह करूं. भृ धातूला क्यप् लागून भृत्य हा शब्द साधतो. क्यप् कर्तरि असतो किंवा कर्मणि असतो. सूर्य हा शब्द सृ धातूला कर्तरि क्यप् लागून झालेला आहे. स्तुत्य हा शब्द स्तु धातूला कर्मणि क्यप् लागून झालेला आहे. भृ धातूला हे दोन्ही क्यप् लागतात. कर्मणि क्यप् लागून झालेल्या भृत्यः या शब्दाचा अर्थ भ्रियते इति भर्तव्यः असा होतो. कर्तरि क्यप् लागून झालेल्या भृत्यः या शब्दाचा अर्थ भरति इति भृत्यः असा होतो. भृ म्हणजे धारण करणें. भृत्य म्हणजे धारण करणारा. आंध्रभृत्य म्हणजे आंध्रांना भरण

करणारा, धारण करणारा, साह्य करणारा, रक्षण करणारा. आंध्र म्हणून कोणी आंध्रदेशीय राजे होते, किंवा आंध्र हें राष्ट्र होतें, त्या आंध्र राजांना किंवा राष्ट्राला किंवा लोकांना साह्य करून रक्षण करणारे जे ते आंध्रभृत्य. शुंगभृत्य या शब्दाचा हि अर्थ शुंगाचे सेवक असा कर्माणि करण्यांत सौरस्य नाहीं, शुंगाचें साह्य करणारे, शुंगाचें भरण, धारण, रक्षण करणारे असा कर्तरि अर्थ करण्यांत स्वारस्य आहे. काण्वायनांनीं शुंगांचें साह्य करून व रक्षण करून, नंतर त्या दुर्बल शुंगांचें राष्ट्र आपण च स्वतः चालविलें. तसें च आंध्रांचें साह्य व रक्षण करून शातवाहनांनीं त्या दुर्बल आंध्रांचें राष्ट्र आपण च स्वतः चालविलें. तात्पर्य, आंध्रभृत्यांच्या म्हणजे शातवाहनांच्या अगोदर आंध्रदेशा वर कोणी आंध्र आर्य किंवा अनार्य राजे होते ते दुर्बल झाले, तेव्हां आर्य जे शातवाहन त्या आर्य आंध्रांनीं दुर्बल आर्य किंवा अनार्य आंध्राचें राज्य व राष्ट्र आपण स्वतः च चालविलें. असा एकंदर इतिहास दिसतो. पुढें या आंध्रभृत्य म्हणजे आंध्रांचें राष्ट्र रक्षण करणाऱ्या शातवाहनांनीं पूर्वेकडील आंध्रदेशा पासून पश्चिमे कडील अपरांतादि सर्व देश जिंकून मोठें विस्तीर्ण साम्राज्य स्थापन केलें. आंध्र, आंध्रजातीय, आंध्रभृत्य, शालिवाहन, शाकवाहन, शातवाहन, शातकर्णि, इत्यादि शब्दांची मीमांसा हीं अशी बरी च विपुल माहिती देणारी आहे. पुराणांतून व शिलालेखांतून व नाण्यां वरून जीं आंध्रभृत्यांचीं पांच पंचवीस नांवें उपलब्ध झालेलीं आहेत, शेवलकुरस व विळिवायकुरस हीं दोन नांवें सुद्धां, तीं सर्व संस्कृत किंवा संस्कृतभ्रष्ट प्राकृत आहेत, ही बाब लक्ष्यांत घेतली म्हणजे हा शातवाहनांचा राजवंश वंशानें व भाषेनें आर्य होता असें म्हणावें लागतें. इतकें च कीं हा राजवंश क्षत्रियवर्णाचा नसून शेतकरी, कुंभार, इत्यादि कनिष्ठवर्णाचा होता. ब्राह्मणकन्या व नागपुरुष यांच्या पासून ह्या राजवंशाची उत्पत्ति झाली, अशी हि आख्यायिका आहे. कोणती हि लोककथा स्वीकारिली, तत्रापि एवढें निश्चित आहे कीं हा शातवाहन राजवंश माहाराष्ट्रिकां प्रमाणें क्षत्रिय नव्हता. नाणेघाटांतील भित्तिचित्रा खालीं शातवाहन राजांनीं महारठिगनकयिरोचा स्वतंत्र उल्लेख कां केला तें आतां स्पष्ट उलगडतें. शातवाहन राजे वंशानें शूद्रसम व देशानें आंध्र होते व माहाराष्ट्रिक लोक वंशानें क्षत्रिय व देशानें दंडकारण्यक होते.

शाकवाहन शब्दाचा दुसरा एक अर्थ आहे. मूळशब्द शक्रवाहन. त्याचा अपभ्रंश सक्कवाहण. सक्कवाहणाचें साकवाहण. त्याचें अज्ञानानें पुनःसंस्कृतीकरण शाकवाहन. शक्रस्वामिकं वाहनं शक्रवाहनं. शक्रवाहनं येषां चिन्हं ते शक्रवाहनाः । शक्रवाहन हें आंध्रभृत्यांचें मूळ आडनांव होतें, असा ह्या निरुक्तीचा अर्थ होतो.

शाकवाहनवंशांत गौतमीपुत्र, वासिष्टीपुत्र, इत्यादि नांवें मातेच्या नांवा वरून पडलेलीं स्पष्ट आहेत. त्या अर्थी मातृवंशपद्धति ह्या शातवाहनवंशांत प्रचलित होती असें म्हणतां येतें. माहाराष्ट्रिकांत मातृवंशपद्धति नव्हती. शातवाहन माहाराष्ट्रिक नव्हते, या विधानाला हें एक आणीक पोषक कारण उपलब्ध होतें.

९४ आंध्रभृत्यां प्रमाणें, चालुक्य हि माहाराष्ट्रिक नव्हते. चालुक्य हे मूळचे अयोध्याप्रांतांतील उच्च वैदिकधर्मी क्षत्रिय होते. चालुक्यां प्रमाणें च राष्ट्रकूट हि चेदिदेशांतील लत्तनूर ऊर्फ रतनपूर प्रांतांतून व शहरांतून आलेले क्षत्रिय लोक होते. यादव मथुरा प्रांतांतून आलेले उत्तरदेशीय क्षत्रिय सर्वप्रसिद्ध आहेत. म्हणजे उत्तरे कडून येणाऱ्या क्षत्रियांच्या विस्तीर्ण साम्राज्य उभारणाऱ्या सामर्थ्या पुढें प्राथमिक गणराज्य करण्याचा अभ्यास करीत असलेल्या माहाराष्ट्रिकांना सदा मान वांकवावी लागे. माहाराष्ट्रिकांना विस्तीर्ण साम्राज्य करण्याची जर ऐपत असती तर शातवाहनांच्या समाप्तीच्या वेळेस आलेली संधि ते फुकट दवडते ना. चालुक्य, राष्ट्रकूट, पुनः आलेले चालुक्य, यादव, इत्यादींच्या समाप्तीच्या वेळीं हि माहाराष्ट्रिकांनीं कांहीं एक हालचाल केलेली नाहीं. ह्या वरून उघड झालें कीं, विस्तीर्ण राज्यें उभारण्याला शस्त्रें, अस्त्रें, मुत्सद्देगिरी इत्यादींची जी वरिष्ठ प्रकारची ऐपत लागते ती महाराष्ट्रिकांच्या ठायीं दिसून येण्याची सोय च नव्हती, इतके ते शस्त्रें, अस्त्रें, मुत्सद्देगिरी व बनाव सजविण्याच्या कामीं दुर्बल होते. ही असली अनुकंपनीय दुर्बलता देशोदेशीं असलेली आढळते. उदाहरणार्थ, प्राचीन ब्रिटन लोक घ्या. रोमन, डेन, आंगल, साक्सन व नार्मन इत्यादि एका पाठी मागून एक बलिष्ट लोक येऊन राज्यें करूं लागले; तत्रापि ब्रिटन मधील ब्रिटन लोक जेथल्या तेथें च सुस्त होते. ह्याचें कारण उच्च प्रकारची कारवाई करण्याची ऐपत ह्या अर्धरानटी लोकांना एका धडयानें येण्याची सोय व संभव नव्हता. दुसरें उदाहरण आपल्या घरचें पंजाब्यांचें घ्या. अफगानी, इराणी, तुराणी इत्यादि नाना वंशांचे मुसलमान पंजाबांत आले, समाप्त झाले व त्यांची जागा दुसऱ्या वंशाच्या मुसुलमानांनीं पटकाविली; परंतु पंजाबी जागच्या जागीं निश्चेष्ट होते. तो च प्रकार माहाराष्ट्रिक नांवाच्या गणराजांचा होता. शातवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, हे उत्तरे कडील क्षत्रिय आर्य पडल्या मुळें त्यांचें अधिराज्य माहाराष्ट्रिकांना दुःसह वाटलें नाहीं अशी तात्पुरती कल्पना करूं; परंतु यादवांच्या नंतर परधर्मी व क्रूर मुसुलमान आले त्या वेळीं तरी माहाराष्ट्रिकांनीं काय केलें ? कांहीं केलें नाहीं. स्वस्थ होते. उलटें, मुसुलमानांची पाइकी करण्यास हे लोक तयार झाले. ह्याचा अर्थ इतका

च कीं, स्वराज्य व साम्राज्य उभारण्याची ऐपत ज्या उच्च संस्कृतीनें आंगीं बाणते ती संस्कृति ह्या प्राथमिक माहाराष्ट्रिक लोकांत नव्हती.

९५ राजकीय दृष्ट्यां माहाराष्ट्रिक लोक हे असे अगदीं बाल्यावस्थेंत होते. त्यांच्यांत शकपूर्व १०० पासून शकोत्तर १५०० पर्यंतच्या सोळाशें वर्षांत राजकीय दृष्ट्या विशेष प्रगती होण्याची शक्यता नव्हती. ह्या अशक्यतेचें मुख्य कारण माहाराष्ट्रिक लोक ज्या हेतूनें दक्षिणेंत उतरले त्या हेतूंत सांपडतें. दक्षिणेंत उतरण्याचा माहाराष्ट्रिकांचा मुख्य हेतु स्वधर्मरक्षणार्थ नवीन वसाहती करणें हा होता. हें वसाहती करण्याचें काम सोळाशें वर्षे त्यांचें एक सारखें खळ न पडतां चाललें होतें. त्या मुळें वरती येऊन अधिराज्य कोणी केलें तरी त्याची त्यांना बिलकूल फिकीर वाटत नसे. वसाहती करण्याच्या कामांत अधिराजा आड आला नाहीं म्हणजे त्याच्या विरुद्ध माहाराष्ट्रिकांची तक्रार नसे. नवीन वसाहत करावी, तेथें पांच पंचवीस गांवें वसवावीं व तेथील पट्टकीलपणा व देशमुख्यपणा स्वयमेव स्वीकारून आनंदानें कालक्रमणा करीत असावी, असा व्यवसाय माहाराष्ट्रिकांचा असे. सोळाशें वर्षांत माहाराष्ट्रिकांनीं वसाहती वसविण्याचें काम मात्र नमुनेदार केलें असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं. माहाराष्ट्रिकांनीं वसाहती केल्या म्हणजे उत्तरे कडील बलिष्ठ व कर्ते क्षत्रिय येऊन त्यांच्या वसाहतीं वरती आयतेंच अधिराज्य करीत. संस्कृतीनें कनिष्ठ दर्जाच्या कोंबडीनें अंडीं घातलीं म्हणजे वरिष्ठ संस्कृतीच्या गांवढ्यानें त्यां पैकीं कांहीं खाल्लीं असतां कोंबडीचें जसें कांहीं च बिघडत नाहींसें दिसतें, ती अंडीं घालण्याचें काम चालू च ठेवित्ये, त्या प्रमाणें माहाराष्ट्रिकांनीं वसाहती घातल्या वर त्यांतून कर घेण्याचें काम अधिराज येऊन हलकें च करीत व नवीन वसाहती घालण्याचें मेहनतीचें व सोशिकपणाचें काम माहाराष्ट्रिक चालू ठेवीत. माहाराष्ट्रिकांच्या वसाहतींच्या स्थापनेची दिशा त्यांच्या वरील अधिराज्यांच्या स्थापनेच्या दिशेवरून उत्तमोत्तम रेखाटतां येते. दक्षिणेंत पहिलें मोठें साम्राज्य म्हणजे पैठणास आंध्रभृत्यांचें. त्या च प्रमाणें माहाराष्ट्रिकांची पहिली मोठी भरभराटलेली वसाहत म्हणजे पैठणप्रांतांतली गोदावरीच्या तीरची. त्या च सुमारास विद्याधरवंशीय शिलाहारांचें राज्य तुंगभद्रेच्या तीरा जवळील तवरगिरीस म्हणजे तगरास स्थापिलें गेलें. म्हणजे तुंगभद्रेच्या तीरीं माहाराष्ट्रिकांनीं दक्षिणे कडून वसाहती केल्या. नंतर तगरच्या उत्तरेस माहाराष्ट्रिकांनीं आपल्या वसाहतीं वातापि ऊर्फ बादामी प्रान्तात नेल्या. त्या बरोबर पूर्व चालुक्यांनीं आपलें साम्राज्य बादामीस रोवलें. पुढें माहाराष्ट्रिक मालखेडपर्यंत उत्तरेस चढले. तेव्हां राष्ट्रकूटांनीं आपल्या

साम्राज्याची राजधानी मालखेडास नेली. कालान्तरानें माहाराष्ट्रिक मालखेडाच्या उत्तरेस कल्याणीकलबुर्गा प्रांतांत शिरले, तों त्यांच्या पाठोपाठ उत्तरचालुक्यांनीं कल्याणी शहराला आपल्या राजधानीत्वाचा मान दिला. शेवटीं कल्याणी-कलबुर्ग्याच्या उत्तरेस देवगिरी प्रांत माहाराष्ट्रिकांनीं वसविल्या वर यादवांनीं देवगिरीच्या अजिंक्य खडका वरून सर्व दक्षिणापथाचें अधिराज्य हांकिलें. इकडे तगराहून कांहीं माहाराष्ट्रिक करवीर टापूंत सरकले, तेव्हां शिलाहारांनीं करवीर-कऱ्हाड ह्या जागीं आपलीं मुख्य ठाणीं उभारिलीं. आणि तेथून खुद्द समुद्रतीरीं विजयाचे बाहुटे रोविले. अश्या तऱ्हेनें सोळाशें वर्षे वसाहती करण्याचा व देशमुख्या पटकाविण्याचा निरुपद्रवी उद्योग माहाराष्ट्रिकांनीं चालविला होता आणि उत्तरे कडील साहसी क्षत्रियांनीं ह्या वसाहतींच्या पाठोपाठ साम्राज्यें उभारण्याचा खटाटोप आंगिकारिला होता.

९६ शातवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव इत्यादि उत्तरे कडील साहसी राज्यकर्त्यांनीं दक्षिणेंत जीं साम्राज्यें उभारिलीं तीं परकीय व अल्पसंख्याक परंतु संस्कृतीनें वरचढ अश्या लोकांनीं कमतरसंस्कृतीच्या माहाराष्ट्रिकां वर उभारलेलीं अधिराज्यें होतीं हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. ह्या परकीय अल्प-संख्याक राजकर्त्यांचे गुण उचलण्याची ऐपत किंवा बुद्धि माहाराष्ट्रिकांच्या ठाईं अत्यल्प होती, किंबहुना मुळीं च नव्हती म्हटली असतां चालेल. शातवाहनांचे विहार, चालुक्यांचीं व यादवांचीं सुंदर देवालयें व राष्ट्रकूटांचीं लेणीं ह्या परकीय राज्यकर्त्यांच्या राशियतींतील स्थापत्यकलाविषयक प्रावीण्याची साक्ष देतात. फर्दापूर व दौलताबाद येथील मूर्तिकर्म व चित्रकर्म ह्या राज्यकर्त्यांच्या वेळच्या अद्भुत कारागिरीचीं मूर्तिमंत स्मारकें आहेत. पण, ह्या परकीय स्थापत्यकलेचा, मूर्तिकर्माचा किंवा चित्रकलेचा गंध हि माहाराष्ट्रिकांना कधीं शिवलेला दिसत नाहीं. हे परकीय राज्यकर्ते अस्तंगत झाल्या बरोबर त्यांच्या कला हि त्यांच्या बरोबर अस्तास गेल्या. ह्या कला जर महाराष्ट्रांतील महरट्ट लोकांच्या असत्या, तर चालुक्यराष्ट्रकूटादि राज्यकर्ते गेल्या बरोबर देशांतून त्या समूळ नाहींश्या झाल्या नसत्या. पुढें मराठ्यांच्या अंमलांत त्या पुनः उदयास आल्या असत्या म्हणावें तर दोन अडीच शें वर्षांच्या मराठ्यांच्या अमदानींत एक हि देऊळ किंवा एक हि मूर्ति किंवा एक हि चित्र असें दाखवितां यावयाचें नाहीं कीं जें चालुक्यादींच्या देवालयाशीं किंवा मूर्तींशीं किंवा चित्राशीं दूरची हि बरोबरी करील. ह्या साऱ्या रडगाण्याचा अर्थ असा कीं माहाराष्ट्रिक लोक बऱ्या च कनिष्ठ संस्कृतीचे लोक होते. साम्राज्यें चालविण्याची कला जशी त्यांच्या आटोक्याच्या बाहेरची होती तश्या च इतर हि उच्च कला त्यांच्या होऱ्यांत येण्या सारख्या नव्हत्या.

९७ भाषेच्या व वाङ्मयाच्या हि प्रांतांत माहाराष्ट्रिक लोक असे च मागसलेले होते. शाकवाहनांच्या कारकीर्दीत राज्यकर्ते प्राकृत भाषा बोलणारे पडल्या मुळें, महाराष्ट्री भाषेला किंचित् उत्तेजन मिळालें. त्या उत्तेजनाचें फल एवढें च झालें कीं शें दोन शें महाराष्ट्री कवि किंचित् गुणगुण करूं लागले. गाथासप्तशतींत बऱ्या च महाराष्ट्री कवींच्या कृतींतील उतारे हाल शातवाहनानें दिले आहेत. ह्या काव्यप्रांता खेरीज शास्त्र, व्याकरण, मीमांसा, गणित, ज्योतिष, स्थापत्य, इतिहास इत्यादि गहन विषयां वर महाराष्ट्रींत एक ओळ हि लिहिली गेली नाहीं. रावणवहो, गौडवहो, कर्पूरमंजरी, हीं हलक्या वाङ्मया वरील पांच चार मोठीं म्हणावयाचीं पुस्तकें काय तीं महाराष्ट्री भाषेंतलि ग्रंथसंपत्ति होय, आणि हे हि पांच चार ग्रंथ महाराष्ट्री भाषा मृत्युपंथास लागल्या काळचे आहेत, महाराष्ट्रीच्या ऐन तारुण्यांतील नव्हत. जैनमहाराष्ट्री हि निराळी च बोली असल्या मुळें, तींतील धर्मादिविषयक ग्रंथ प्रस्तुतप्रकरणीं जमेस धरण्या सारखे नाहींत. संस्कृत नाटकांत उच्च स्त्रियांच्या तोंडीं जीं पद्यें कवींनीं घातलेलीं आढळतात तीं एवढें च दाखवितात कीं महाराष्ट्री भाषेंत सुंदर पद्यरचना बरी च कमाविली गेली होती. उच्च स्त्रियांच्या तोंडीं महाराष्ट्री पद्यें घालीत ह्याचें कारण असें होतें कीं हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व राजे माहाराष्ट्रिक स्त्रियांशीं विवाह करण्यांत भूषण मानीत, अश्या करितां कीं ह्या माहाराष्ट्रिक ऊर्फ माहाराजिक लोकांचा वंश त्या कालीं अत्यंत शुद्ध गणिला जाई. असा हा माहाराष्ट्रिकांच्या भाषेचा एकंदर पल्ला होता. वाङ्मयवैपुल्याच्या दृष्टीनें किंवा भारदस्तपणाच्या दृष्टीनें हा पल्ला अत्यन्त क्षुद्र होता. पण तो हि थोडक्या च अवधींत संपुष्टांत आला. शक पांचशें च्या सुमारास महाराष्ट्री भाषेला उतरती कळा लागली. शक पांच शें पर्यंत शिलालेख, ताम्रपट, काव्यग्रंथ, वगैरे लिखाण प्राकृत भाषेंत होत असे, तें चालुक्यांच्या अमदानी पासून बंद पडून संस्कृत भाषेंत होऊं लागलें. व्रात्यांच्या व पतितांच्या व पाखंडांच्या बौद्धक्रांतीला व त्यांच्या प्राकृत भाषांना आळा घालतां घालतां, वैदिक धर्माचें व संस्कृत भाषेचें पुनरुज्जीवन ब्राह्मणांना व त्रैवर्णिकांना शक चारशें पाचशें च्या सुमारास शक्य झालें. संस्कृतसिंह आखाड्यांत उतरल्या बरोबर प्राकृतमर्कटांनीं भयानें बहुतेक प्राणत्याग केला. महाराष्ट्री भाषा सरकारदरबारांतून मागें पडावयाला वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन हें तर एक कारण झालें च. परंतु ह्या हून हि जबरदस्त कारण कित्येक शतकें महाराष्ट्री भाषेला समाधि देण्याचें काम संथपणें करीत होतें. तें कारण सामाजिक होतें. माहाराष्ट्रिक लोक ज्या कालीं दक्षिणारण्यांत वसाहती करण्यास उतरले त्या कालीं त्यांना ह्या प्रदेशांत त्यांच्या हून हि संस्कृतीनें कनिष्ट असे दुसरे एक लोक भेटले. हे लोक म्हणजे ज्यांना नागलोक म्हणतात ते. जनमेजयानें जेव्हां सर्पसत्र म्हणजे नागांचा

नायनाट आरंभिला तेव्हां हे लोक उत्तरेतून दक्षिणेंत आले. जनमेजयाच्या वेळची जी जुनाट संस्कृत म्हणजे वैदिक भाषा तिचा अपभ्रंश हे नाग लोक बोलत. ह्या नागलोकांची एकंदर संस्कृति माहाराष्ट्रिकांच्या संस्कृती हून हि खालच्या दर्ज्याची होती. ह्यांशीं शरीरसंबंधादि मिलाफ माहाराष्ट्रिकांचा होऊन आस्तेआस्ते माहाराष्ट्रिक व नाग ह्यांच्या मिश्रणा पासून एक नवीन राष्ट्र उत्पन्न होत होतें. हें नवीन राष्ट्र म्हणजे ज्यांना महरट्टे, म्हराटे, मऱ्हाटे, मराठे म्हणतात ते. एक भाषा बदलून तिच्या स्थानीं तत्सदृश अशी दुसरी भाषा जेव्हां प्रचलित झालेली दिसते तेव्हां त्या भाषान्तरप्रचलनाच्या बुडाशीं दोन राष्ट्रांचें किंवा लोकांचें सम्मेलन झालेलें नियमानें आढळतें. सामाजिक संम्मेलन ज्या मानानें दाट किंवा विरळ असेल त्या मानानें त्या दोन भाषांचें मिश्रण दाट किंवा विरळ होतें. एक समाज दुसऱ्या समाजा हून अती च अती बलिष्ठ असला व हे दोन समाज शेजाराला आले व त्यांच्यांत विशेष संघट्टन झालें, तर कनिष्ठ समाजाची भाषा अजीबात मरून जाते व तो कनिष्ठ समाज बलिष्ठ समाजाची भाषा अपभ्रष्ट रूपानें सर्वस्वीं बोलूं लागतो. त्रैवर्णिक व एतद्देशज शूद्र या दोन समाजांचें जेव्हां सम्मेलन झालें तेव्हां हा प्रकार घडून आला. शूद्रांची मूळ भाषा सपशेल बुडून गेली. नागांचा व आर्यांचा जेव्हां उत्तर हिंदुस्थानांत जनमेजयकालीं व तत्पूर्वीं संगम झाला, तेव्हां हि हा च प्रकार घडला. नागांची मूळ भाषा अजीबात लोपून गेली व ते वैदिक भाषेचा अपभ्रष्ट उच्चार करून ती आर्यभाषा बोलूं लागले. माहाराष्ट्रिकांचा व नागांचा जेव्हां दक्षिणेंत संगम, सहवास व शरीरसंबंध झाला, तेव्हां नागांचा जुनाट वैदिक भाषापभ्रंश व माहाराष्ट्रिकांची महाराष्ट्री ह्या दोन अपभ्रष्ट आर्यभाषांचा मिलाफ होऊन दोन्हींच्या लकबा जींत दृष्टचुत्पत्तीस येतात ती मराठी भाषा जन्मास आली. मराठी भाषेंत महाराष्ट्रींत नाहींत परंतु वैदिक भाषेंत आहेत व संस्कृत भाषेंत नाहींत परंतु वैदिक भाषेंत आहेत असे प्रयोग व प्रत्यय व क्रियापदरूपें जीं दृष्टिस पडतात त्याचें कारण नागांची महाराष्ट्री भाषेहून जुनी अशी वैदिकभाषापभ्रंशभाषा होय. महाराष्ट्रींत नाहींत परंतु वैदिकभाषेंत आहेत अश्या दोन लकबा उदाहरणार्थ येथें उतरतों. मराठींत करूनश्यानी, जेऊनश्यानी, घेऊनश्यानी असें एक धातुसाधित अव्यय शूद्रांच्या व देशस्थांच्या बोलण्यांत येतें. हा श्यानी प्रत्यय आर्ष, मागधी, महाराष्ट्री, सौरसेनी, पैशाची, अपभ्रंश किंवा प्राकृतभाषा ऊर्फ पाअडभाषा ऊर्फ पाली भाषा अश्या कोणत्या च प्राकृत भाषेंत नाहीं. हा प्रत्यय पाणिनीय संस्कृत भाषेंत हि नाहीं. हा फक्त वैदिक भाषेंत आहे व तो हि अत्यंत तुरळक आहे. वैदिक भाषेंत सन् ला इ प्रत्यय लागून सनि असें सतम्यंत रूप धातूंना जोडून

 

कांहीं थोडीं धातुसाधित अव्ययें बनतात; जसें, गृणीषणि, तरीषणि, नेषणि इ. इ. इ. ह्या सनि–षणि प्रत्यया पासून मराठी श्यानि प्रत्यय आला आहे. आतां श्यानि प्रत्यय मराठींत महाराष्ट्रींतून तर आला नाहीं, कारण महाराष्ट्रींत असा प्रत्यय च मुदलांत नाहीं. तेव्हां मराठींत तो आला कोणत्या द्वारानें? मराठीचा व वैदिक भाषेचा निकट सहवास तर कालान्तरा मुळें कधीं च शक्य नव्हता. तेव्हां एक च तोड राहिली. हा प्रत्यय नागलोकांच्या वैदिक अपभ्रंशांतून मराठींत आला. दुसरें उदाहरण झडकरि, चटकरि इत्यादि धातुसाधित अव्ययांचें. करि हें धातुसाधित अव्यय कोणत्या च प्राकृतांत नाहीं. फक्त वैदिक भाषेंत इ प्रत्यय धातूंना लागून दृशि, बुधि, संचक्षि अशीं धातुसाधितें आढळतात. कर् धातूला इ प्रत्यय लागून झालेलें हें करि धातुसाधित नागांच्या वैदिक अपभ्रंशद्वारा च तेवढें मराठींत येण्याचा संभव आहे. तात्पर्य, माहाराष्ट्रिकांचा व नागांचा मिलाफ शकोत्तर पांचशेंच्या सुमारास परिपूर्ण होऊन, केवळ महाराष्ट्री भाषा बोलणारे लोक महाराष्ट्रांत राहिले नाहींत, माहाराष्ट्रिकनागोत्पन्न अशी सर्व प्रजा मराठी अपभ्रंश बोलूं लागली. महाराष्ट्री भाषेला असा हा मृत्यु नागांच्या संमेलनानें आला. महाराष्ट्री भाषा बोलणारे च कोणी न राहिल्या मुळें, त्या भाषेचा उपयोग शकोत्तर चार–पांचशेंच्या सुमारास चालुक्यादि परकीय संस्कृत भाषा समजणाऱ्या राज्यकर्त्यांनीं सार्वजनिक शिलालेखांत व ताम्रपटांत वगैरेंत सहज च केला नाहीं. मराठींत ताम्रपटें व शिलालेख कोरावे तर त्या नव्या भाषेला अद्याप शिष्टमान्यता आली नव्हती. तेव्हां चालुक्यादींच्या सार्वजनिक लेखांत संस्कृतभाषेचा उपयोग करण्या शिवाय गत्यन्तर राहिलें नाहीं. नाटकांतून वगैरे ग्रंथांतून महाराष्ट्रीचा उपयोग कवि करीत, परंतु तो उपयोग केवळ परंपरागत रूढि म्हणून करीत, महाराष्ट्री भाषा जिवंत होती म्हणजे ती भाषा बोलणारे कोणी लोक शकोत्तर पांचशें नंतर राहिले होते म्हणून करीत नसत.

९८ येणें प्रमाणें शक पांचशेच्या सुमारास मराठे म्हणून ज्यांना म्हणतात ते लोक माहाराष्ट्रिक व नाग यांच्या हजारपांचशें वर्षांच्या संगमा पासून महाराष्ट्रांत निपजले. ह्या मराठ्यांची संस्कृति, अर्थात्, माहाराष्ट्रिक व नाग ह्यांच्या संस्कृतीं हून निराळी नव्हती, दोहोंच्या संस्कृतींचें मिश्रण होती. ह्या मिश्रणांत नागांचें प्रमाण किती व महाराष्ट्रिकांचें प्रमाण किती, तें हि अजमाविण्यास साधनें आहेत. महाराष्ट्री पुत्त व मराठी पूत् ( तोंडी ) ह्या शब्दांचीं विभक्तिरूपें देतों व त्यांत माहाराष्ट्रिकांच्या महाराष्ट्रीचा अंश किती व नागांच्या वैदिकअपभ्रंशाचा भाग किती त्याचा निर्णय करतों. ह्या निर्णया वरून मराठी संस्कृतींत महाराष्ट्री व नाग ह्या दोन संस्कृती कोणत्या प्रमाणांत

मिश्र झाल्या त्याचा स्थूल अंदाज करतां येईल.

| | महाराष्ट्री | अंपभ्रश | मराठी |
|---|---|---|---|
| | | (१) | |
| | पुत्त | पुत्त | पूत् ( तोंडी ) |
| १ | पुत्तो | पुत्तु | पूतु ( प्राचीन ), पूत् ( अर्वाचीन तोंडी ) |
| २ | पुत्तं | पुत्तु | पूतु ( प्रा. ), पूत् ( अर्वा. तोंडी ) |
| ३ | पुत्तेण | पुत्तिण, | पुत्तेँ ( लेखी ), पूतानें, पूतेँ , पूतानँ ( तोंडी ) |
| ४ | पुत्ताअ | पुत्ताअ | पूता |
| ५ | पुत्तत्तो<br>पुत्ताहिंतो<br>पुत्ताउ<br>पुत्ताहि | पुत्तहु | पूतातून्<br>पूनाहून् |
| ६ | पुत्तस्स | पुत्तह | पूता |
| ७ | पुत्तम्मि<br>पुत्ते | पुत्ति<br>पुत्तहिँ | पूतीँ<br>पूताँत |
| ८ | पुत्त<br>पुत्ता | | पूत् ( तोंडी )<br>पूता |

(२)

| | महाराष्ट्री | अंपभ्रश | मराठी |
|---|---|---|---|
| १ | पुत्ता | पुत्ता, पुत्त | पूत् ( तोंडी ) |
| २ | पुत्ता | पुत्ता, पुत्त | पूत् ( तोंडी ) |
| ३ | पुत्तेहिँ | पुत्तेहिँ<br>पुत्तहिँ | पूतांहीं<br>पूतांनीं<br>पूतीँ |
| ४ | —— | —— | पूताँ |
| ५ | पुत्ताउ<br>पुत्तत्तो | पुत्तहुँ | पूताँहून्<br>पूतांतून् |
| ६ | पुत्ताणँ | पुत्ताहँ | पूताँ |
| ७ | पुत्तेसु | पुत्तिहिँ | पूतीँ |
| ८ | पुत्ता | पुत्तहो | पूतानों, पूतहो ( तोंडी ) |

महाराष्ट्री पुत्त शब्द मराठींत पूत् होतो म्हणजे त्त या संयोगाचा त् असा असंयोग होतो व संयोगाच्या पूर्वील स्वर ऱ्हस्वाचा दीर्घ होतो. जे माहाराष्ट्रिक त्त असा पूर्वी उच्चार करीत ते स्वतःच त् असा नंतर उच्चार करूं लागले, असें म्हणून भागणार नाहीं. त्त चा त् उच्चार होण्याला कांहीं तरी बहिःकारण पाहिजे. हें बहिःकारण नागलोक होत. नागांना ( १ ) जोडाक्षरें उच्चारण्याचा कंटाळा असे. तसेंच ( २ ) अन्त्य अ उच्चारण्याचा हि कंटाळा असे. ( ३ ) संयोगा पूर्वील स्वर दीर्घ उच्चारण्याची हि त्यांना खोड असे. माहाराष्ट्रिकांचा व नागांचा जेव्हां मिलाफ झाला तेव्हां नागांच्या ह्या तिन्ही खोडी माहाराष्ट्रिकां वर लादल्या गेल्या आणि त्या खोडी नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न जे मराठे त्यांच्या मराठी भाषेंत दिसूं लागल्या. माहाराष्ट्रिकांचे फक्त ए, उ आणि त् हे तीन उच्चार तेवढे राहिले. महाराष्ट्री पुत्तो तील ( ४ ) अन्त्य ओ चा नागांनीं उ करून पूतु असें रूप बनविलें. ओ उच्चारा हून उ उच्चार नागांना सोपा वाटे. महाराष्ट्री पुत्तेण चें अन्त्य अ गाळून व ( ५ ) न् चा अनुनासिक करून नागांनीं पूतेँ असें उच्चारण केलें. माहाराष्ट्रिकांना स्वरा पुढें स्वर संधि न करतां उच्चारण्याची खोड फार. ( ६ ) ती खोड नागांनीं मोडून टाकून पुत्ताअ चें पूता बनविलें. महाराष्ट्री पुत्तत्तो तील ओ चा उ करून, जोडाक्षरांचीं साधीं अक्षरें करून व ( ७ ) अनुनासिक लटकावून पूतातून् असें पंचमीचें रूप बनविलें. पुत्ताउ तील ( ८ ) उ चा हु, हु चा हूँ व हूँ चा हून् बनवून पूताहून् हें रूप रचिलें. पुत्तस्स मधील ( ९ ) स चा ह व ह चा अ करून पूता असें रूप निर्मिलें. हे नऊ फेरफार फारसे कमत्कारिक नाहींत. सर्वांत अत्यन्त चमत्कारिक फेरफार म्हटला म्हणजे ( १० ) पूताँ, पूताँहीँ, पूताँनीँ, पूताँहून्, पूताँतून्; पूतानों, ह्या अनेकवचनीं रूपांतील ता वरील अनुनासिकाचा होय. मराठींत पूता हे चतुर्थीचें एकवचन आहे व पूताँ हें चतुर्थीचें अनेकवचन आहे. तसेंच, संबोधनाचें एकवचन पूता आहे व अनेकवचन पूतानोँ आहे. पूतानोँ हा पूतान्हो ह्या रूपाचा अपभ्रंश आहे. येथें असा प्रश्न येतो कीं पूताँ व पूतान्हो या अनेकवचनीं रूपांत अनुनासिक व नकार कोठून आला? हा च प्रश्न थोडा विस्तृत करून असा प्रश्न येतो कीं मराठींत पुत्रांस्, पुत्रांना, पुत्रांतें, पुत्रांहून, इत्यादि रूपांत अनेकवचनीं अनुस्वार व अनुनासिक कोठून येतात? महाराष्ट्रींत तर हे अनुनासिक–अनुस्वार नाहींत. प्रश्नाला उत्तर असें आहे कीं हे अनुनासिक–अनुस्वार मराठींत नागभाषेंतून आले. पूर्ववैदिकभाषेंत पुत्र ह्या शब्दाचें प्रथमेचें अनेकवचन ( १ ) पुत्रासः, ( २ ) पुत्राः, ( ३ ) पुत्रे व ( ४ ) पुत्रान् असें चार प्रकारांनीं होत असे. 'संस्कृत भाषेचा उलगडा' ह्या

निबंधांत हा चतुर्विध प्रकार मीं दाखवून दिला आहे. वेदांत पुत्रान् ह्या सांच्याचें म्हणजे अन् प्रत्ययान्त रूप अनेकवचनी प्रथमेचें क्वचितत् येतें. अन् प्रत्ययान्त रूप द्वितीयेच्या अनेकवचनाचें असतें हें सर्वांच्या नित्यपरिचयाचें आहे. परंतु वेदांत क्वचित् हें अन्प्रत्ययान्त रूप प्रथमेच्या अनेकवचनीं योजिलेलें पाहून, सायणाचार्यांनीं छंदसि बहुलं या घबाड नियमाचा आश्रय करून, हें अन्प्रत्ययान्त रूप प्रथमेच्या अनेकवचनाचें आहे असें विधान स्वच्छ केलें आहे. आणि असें विधान केल्या वांचून दुसरी गति नव्हती. सायणाच्या ह्या साहसी विधाना बद्दल तुच्छतादर्शक आश्चर्य दर्शविण्याचें कारण नाहीं. पूर्ववैदिक भाषेंत व वैदिक भाषेंत हि प्रथमेचें अनेकवचन अन्प्रत्यय लागून होत असे हें मला नुकतें च अली कडे दोन वर्षां खालीं कळून आलें आहे. पुत्रान् हें प्रथमेचें अनेकवचन ज्या एका पूर्ववैदिक भाषेंत होतें त्या पूर्ववैदिक भाषा बोलणाऱ्या ऋषिलोकांचा व नागांचा मिलाफ होऊन नागांनीं हें अन्प्रत्ययान्त रूप उचललें. ह्या पूर्ववैदिक पुत्रान् रूपाचा अपभ्रंश नागभाषेंत पुत्तां, पुत्ताँ असा होऊन त्या नागभाषेच्या द्वारा मराठींत पूतां, पूताँ अश्या रूपानें तो प्रविष्ट झाला. पूतांस्, पूतानीं, इत्यादि मराठी अनेकवचनी रूपांत अनुस्वार—अनुनासिक कोठून आले त्याचा हा असा हिशेब आहे. त्यांना व त्यान्ला, त्याँतून् व त्यान्तून्, त्यांचे व त्यान्चे, अशीं अनुनासिक—अनुस्वार—न्कारयुक्त रूपें येतात, त्याचें कारण वैदिक भाषेंतून नागलोकांनीं उचललेलें हें प्रथमेचें अनेकवचनी अन्प्रत्ययान्त रूप होय. पूतान्हो=पूतानों या मराठी रूपांत तर हें अन्प्रत्ययान्त रूप स्पष्ट दिसतें. महाराष्ट्रींत संबोधनाच्या अनेकवचनीं अन्प्रत्ययान्त किंवा अनुस्वार—अनुनासिकयुक्त रूप नाहीं. वर दिलेल्या सोळा मराठी विभक्तिरूपांत असेच आणिक निदान दहा बारा नागभाषेंतील विशेष दाखवून देतां येतील. म्हणजे सोळा महाराष्ट्री रूपांत नागभाषेच्या संसर्गानें सुमारें वीस पंचवीस फेरफार झाले, अशी फलनिष्पत्ति होत्ये. सबंद महाराष्ट्री भाषा सबंद मराठी भाषेशीं जर तोलली तर नागभाषेचा संस्कार महाराष्ट्री भाषे वर एकास दीड ह्या प्रमाणा वर झालेला आढळावा असा स्थूल अंदाज आहे. ह्या नैरुक्तिक विधानाचा समाजदृष्ट्या असा अर्थ होतो कीं माहाराष्ट्रिक लोकांत नागलोकांचें मिश्रण एकास दीड ह्या प्रमाणांत होऊन मराठे लोक ज्यांस म्हणतात ते निर्माण झाले. माहाराष्ट्रिकांची संस्कृति नागलोकांच्या संस्कृतींहून किंचित् श्रेष्ठ असल्या मुळें, नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न नव्या लोकांना मराठे हें नांव माहाराष्ट्रिक ह्या नांवा वरून प्रचलित झालें, नागलोकांच्या नांवा वरून नागे असें नांव प्रचलित झालें नाहीं.

९८ नागस्त्रियांशीं आस्तिकादि ऋषींचे व अर्जुनादि क्षत्रियांचे शरीरसंबंध

होऊन पितृसावर्ण्यानें ब्राह्मण व क्षत्रिय प्रजा झालेली महाभारतादि इतिहासांतून प्रसिद्ध आहे. महाभारतांत व विष्णुपुरादि पुराणेतिहासग्रंथांत कश्यपाच्या तेरा स्त्रियां पैकीं कद्रूच्या पोटीं नागांची उत्पति सांगितली आहे. ह्या दंतकथेंत इतिहासभाग असा समजावयाचा कीं कश्यप समुद्रा भोंवतालील म्हणजे आर्वाचीन-काळीं यूरोपियन लोक ज्याला क्यास्पियन समुद्र म्हणतात त्याच्या भोंवतालील प्रांतांतून राक्षस, गरुड, नाग, इत्यादि लोक अत्यंत प्राचीन काळीं रहात असत. तेथून परिभ्रमण करीत करीत नागलोक काश्मीर, तक्षशिला, सिंधु, मथुरा, इत्यादि प्रदेशांतून पाताळांत म्हणजे नर्मदेच्या दक्षिणेस उतरले. दक्षिणेंत वसाहती करून त्यांनीं अनेक गांवें वसविलीं व क्षुद्र राज्यपद्धति निर्माण केल्या. नागलोकांचीं शंभर कुळें होतीं पैकीं जनमेजयानें वासुकी, तक्षक, ऐरावत इत्यादिकांचीं अनेक कुळें मारिलीं. ह्या नागलोकांत स्त्रियांचें प्राबल्य प्रधान असे. अर्वाचीन नायर लोक नागांचे वंशज होत. नाग शब्दाला संबंधार्थक प्राकृत केर प्रत्यय लागून नागकेर हा प्राकृत शब्द झाला. ह्या नागकेर शब्दाचा अपभ्रंश नाअएर, नाएर, नायर. यलबुर्ग्याचे सिंद ( शक ९००—११०० ) नागवंशीय होते व ह्यांच्या ध्वजे वर नागांचें चित्र असे. सध्यां ग्वालेरच्या शिंद्यांच्या मुद्रे वर हि दोन नागांच्या प्रतिमा असतात. शिंदा हा शब्द शक ९०० तील सिंदः ह्या शद्वाचा अपभ्रंश आहे. सेंद्रकः शब्दा पासून सिंदा शब्द झाला अशी कित्येकांची समजूत आहे, परंतु ती साधार नाहीं. सेंद्रक शब्दां पासून शेंद्रे हें मराठा आडनांव होतें. तात्पर्य, हे नागलोक माहाराष्ट्रिक लोकांच्या फार पूर्वीं नर्मदे पासून त्रावणकोर पर्यंतच्या मुलखांत पसरले होते. माहाराष्ट्रिकांचा व नागांचा मिलाफ शकपूर्व ६०० पासून शकोत्तर ४०० पर्यंत एक हजार वर्षें होऊन, त्या दोघांच्या मिश्रणानें मराठे म्हणून ज्यांस म्हणतात त्या लोकांची उत्पत्ति झाली. दोन्ही लोक गणराज्यां सारख्या क्षुद्रराज्यपद्धति चालविणारे असून, त्यांना त्यांहून वरिष्ठ राज्यपद्धति चालविण्याची ऐपत व अर्थात अक्कल आलेली नव्हती. तेव्हां उत्तरे कडील चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, वगैरे सम्राटांची पाइकी करण्यांत ह्यांचें क्षात्रतेज खर्ची पडे तें यथायोग्य हातें. माहाराष्ट्रकांच्या महाराष्ट्र भाषेंत कांहीं काव्यवाङ्मय तरी असे. नागांच्या नागभाषेंत जें काय वाङ्मय असे तें सर्व तोंडी असून त्याला अक्षरसंनिवेश कधीं च मिळाला नाहीं. अश्या ह्या निरक्षर नागांचे व ईषदक्षर माहाराष्ट्रिकांचे प्रज जे मराठे त्यांच्यांत ह्या दोन्ही वंशांतील दोष व गुण उतरून त्यांची संस्कृति माहाराष्ट्रिकांहून कमतर व नागांहून किंचित् उच्चतर अशी निपजली. माहाराष्ट्रिक हे वंशानें सूर्यवंशी क्षत्रिय होते आणि नाग हे शेषवंशी क्षत्रिय होते. ह्या दोन वंशांचा मिलाफ होऊन जे मराठे लोक शक चारशेंच्या सुमारास निपजले त्यांच्यांत सहज च सूर्यवंश व शेषवंश असे दोन वंश

दिसूं लागले. देवधर्मांच्या बाबतींत माहाराष्ट्रिक पुराण वैदिक धर्माचे व बौद्धक्रांतिकालानन्तर उद्भवलेल्या रामकृष्णादींच्या उपासनामार्गाचे अनुयायी होते. नागलोक फार पुरातनकाला पासून सर्पपूजक व वनदेवताभजक असून, बौद्धक्रांतिकालानन्तर बौद्धधर्माचा हि पगडा त्यांच्या वर बसला. बौद्ध भिक्षु व श्रमणक दक्षिणेंत सर्वत्र पसरून जेथें जेथें नागांची वसति होती तेथें तेथें त्यांनीं आपले विहार व धागोबा स्थापिले. दक्षिणारण्यांतील नागांच्या वसतीची कोणती हि डोंगरी किंवा मैदानी तर्फ घ्या, तेथें तेथें बौद्धांच्या विहार व धागोबा यांच्या खुणा मुबलक सांपडतात. उदाहरणार्थ, पुण्या पासून खंडाळ्या पर्यंतच्या तीस मैलांच्या डोंगरी तर्फेत ( १ ) पर्वती, ( २ ) भांबुर्डें, ( ३ ) घोरवडी, ( ४ ) इंदुरी, ( ५ ) फिरंगाइचा डोंगर, ( ६ ) भाजे, ( ७ ) बेडसें, ( ८ ) कार्लें ह्या आठ स्थलीं बौद्धांच्या धर्मांचे अवशेष आढळतात. पुण्या पासून पळसदेवा पर्यंतच्या मैदानी टापूंत हि बौद्ध अवशेष असे च विपुल आहेत. तात्पर्य, बौद्धांची छाप नागलोकां वर त्या कालीं अतिशय बसली. नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न मराठ्यांच्या वर, अर्थात्, वैदिक धर्माची, उपासनामार्गाची, वनदेवतापूजेची, सर्पोपासनेची व बौद्धधर्माची अशी पंचविध छाप बसून, त्यांच्या मनोभूमिकेचा देवधार्मिक भाग एकनिष्ठ न रहातां चित्रविचित्र रंगविला गेला. त्या मुळें अमूक देवधर्माचे मराठे कट्टे विश्वसनीय अनुयायी आहेत असें म्हणण्याची सोय राहिली नाहीं. सगळ्या च देवधर्मांचे जे अनुयायी ते कोणत्या च देवधर्मांचे कट्टे भक्त रहाणें शक्य नव्हतें. अशी ह्या मराठा क्षत्रियांची देवधार्मिक स्थिति शक चारशें पांचशेच्या पुढील तीन चार शतकांच्या अवधींत होती. त्यांना धड आर्य ऐतिह्य हि माहीत नव्हतें, धड बौद्ध ऐतिह्य हि अवगत नव्हतें, आणि नागांच्या वन्यदेवधर्मांत मुळीं ऐतिह्य च नव्हतें. त्या मुळें मराठे म्हणजे महाराष्ट्रांत त्या कालीं एक अडामुठ्यांचा अव्यवस्थित जमाव होऊन बसला होता. निश्चित देव नाहीं, निश्चित धर्म नाहीं, अक्षर नाहीं, ऐतिह्य नाहीं, असे हे लोक राज्यकर्त्यांच्या व देवब्राह्मणांच्या अखंड पराभवाला कारण होऊन गेले. जो खावयाला देईल त्यांच्या बाजूनें लढावयाचें, एवढा एक च ह्यांचा धंदा राहिला. आज चालुक्याच्या बाजूनें लढले, उद्यां राष्ट्रकूटांच्या तैनातींत शिरून चालुक्यांना पाडिलें, पर्वा यादवांची पाइकी स्वीकारून चालुक्यांचा धुव्वा उडविला, आणि शेवटीं मुसुलमानांचे बंदे बनून यादवांचें उच्चाटन केलें; असा हा मराठा क्षत्रिय वर्ग अजाणतेपणें देशांत राजकीय अस्वस्थतेला कारण झाला होता. पोटाला घालण्याला जेव्हां कोणी धनी मिळत नसे तेव्हां रिकामपणाच्या अवधींत हे दंगेखोर लोक एकमेकांशीं लढून प्रतिपक्ष्याची दहा पांच मैल जमीन सर करण्यांत गुंतलेले असत. असल्या अंतःस्थ कलहाच्या हकीकती कांहीं मीं छापिल्या

आहेत व कांहीं मजजवळ अद्याप अप्रकाशित राहिल्या आहेत. हे नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न लोक म्हणजे च शहाजीकालीन अराष्ट्रिय ऊर्फ अधम संस्कृतीचे मराठे लोक होत.

९९ शहाजीकालीन मराठे म्हणजे कोण लोक होते व हे लोक इतके पराकाष्ठेचे अराष्ट्रीय व अधम कसे बनले ह्या प्रश्नाचा उलगडा करण्याच्या खटाटोपा प्रीत्यर्थ ६३ व्या कलमा पासून ९९ व्या कलमा पर्यंतचे ३६ रकाने तपशील द्यावा लागला. हे मराठे लोक क्षत्रिय खरे, परंतु रामकृष्णजनकादि आत्मानात्मविचार करणाऱ्या व साम्राज्यें चालविणाऱ्या थोर क्षत्रियांचे हे साक्षात् वंशज नव्हत, रामकृष्णादिकांच्या काळच्या कांहीं कमसुधारलेल्या आयुधजीवी क्षत्रियांचे व नागांचे हे मुख्यत्वें करून वंशज होत. ह्यांच्या खेरीज दुसरे एक लोक आपणास मराठा क्षत्रिय म्हणून म्हणविणारे शहाजीकालीं होते. परंतु तत्संबंधक मराठा क्षत्रिय ह्या शब्दाचा अर्थ महाराष्ट्रदेशांत कांहीं शतकें राहिलेले उत्तरहिंदुस्थानांतील क्षत्रिय असा होता, नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न मऱ्हाटा असा नव्हता. ह्या महाराष्ट्रदेशनिवासी मराठा क्षत्रियांत चालुक्य, यादव, पल्लव, भोज इत्यादि थोर राजघराण्यांतील क्षत्रियांच्या वंशजांचा समावेश होतो. चाळके, यादव, जाधव, पालवे, भोसले, हे शब्द चालुक्य वगैरे संस्कृत शब्दांचे मराठी अपभ्रंश होत. ह्या थोर राजघराण्यांत पुलिकेशिन्, अमोघवर्ष, विक्रमादित्य, सिंघण, अपरार्क इत्यादि बडीं बडीं धेंडें होऊन गेलीं आणि ह्यांच्या च वंशांत शहाजी व शिवाजी हे अवतारी पुरुष निपजले. जसा महाराष्ट्र ब्राह्मण ह्या शब्दाचा मराठा ब्राह्मण हा मराठी अपभ्रंश आहे, तसाच महाराष्ट्र क्षत्रिय ह्या शब्दाचा मराठा क्षत्रिय हा मराठी अपभ्रंश आहे. महाराष्ट्र ब्राह्मण म्हणजे महाराष्ट्रदेशांतील चिरनिवासी ब्राह्मण असा जसा अर्थ केला जातो, तसा च अर्थ महाराष्ट्र क्षत्रिय म्हणजे महाराष्ट्रदेशांतील चिरनिवासी क्षत्रिय असा अर्थ केला जात असे. हे भोज, यादव, चालुक्य, राष्ट्रकूट, निकुंभ इत्यादि क्षत्रिय संस्कृतादि भाषा जाणणारे असून वैदिक संस्कृतीचे मोठे पुरस्कर्ते असत. ह्यांच्या च आश्रयानें विज्ञानेश्वर, भास्कराचार्य, हेमाद्रि वगैरे नामांकित पंडितांनीं संस्कृतसरस्वतीची अपूर्व सेवा केली. नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न मराठ्यांच्या आश्रयानें भास्कराचार्यादि प्रतिभासंपन्न शोधकांचा निर्वाह झाला नाहीं व झाला नसता. कारण हे पंडित काय करतात व ह्यांच्या कर्तबगारीचा उपयोग काय, हें च मुळीं समजण्याची अक्कल नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न मराठ्यांत नव्हती. भोजचालुक्यादि महाराष्ट्र क्षत्रिय व नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न मराठे ह्यांच्या संस्कृतींत हा असा जमीनअस्मानाचा फरक होता. आणि असा फरक पडल्या मुळें भोजचालुक्यादि महाराष्ट्र क्षत्रिय नागमाहाराष्ट्रिकादि मराठ्यांशीं विवाहादि शरीरसंबंध करण्यांत कमपक्ष मानीत.

हा भेद महाराष्ट्रांत भोसल्यांच्या राजवटींत हि प्रचारांत होता. भोसल्यांचा शरीरसंबंध विवक्षित पंचकुळींत व दसकुळींत च होत असे, हव्या त्या मराठा कुळीशीं होत नसे. कारण भोसले हे महाराष्ट्र क्षत्रिय असल्या मुळें नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न मराठ्यांशीं संबंध करण्यांत त्यांना कमीपणा वाटे. ह्या रूढीचा एक चमत्कारिक व हास्यकारक परिणाम होई. भोसले हे पंचकुळीच्या बाहेरील मराठ्यांना परमार्थानें संस्कृतिदृष्ट्या कमतर समजत, तर उलट बाहेरील मराठे लोक भोसले व त्यांची दसकुळी व पंचकुळी ह्यांना रागानें कमअस्सल म्हणून नांवें ठेवीत! महाराष्ट्र क्षत्रिय व नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न मराठे हे दोघे हि क्षत्रिय च. फक्त संस्कृतींत तेवढा जमीनअस्मानाचा फरक. एका पक्षाची साम्राज्यें चालविण्याची योग्यता तर दुसऱ्याची सामान्य देशमुखी हि टिकविण्याची अयोग्यता. एक चतुरस्र विद्येचा भोक्ता; दुसरा विद्येचा पिढीजात शत्रु. एक सनातनधर्माचा व गोब्राह्मणांचा कैवारी; दुसरा भेटेल त्या देवधर्माचा व साळूमाळूचा अनुयायी. एक सुवर्णयज्ञोपवीत धारण करण्यांत भूषण मानणारा, तर दुसरा नागनरसोबा डोक्या वर घेऊन नाचणारा. असल्या ह्या कनिष्ठ दर्ज्याच्या क्षत्रियाची व्यवस्था कशी लावावी, त्याला सनातनधर्मा कडे कसा वळवावा व तो वाटेल त्याची पाइकी न करील अशी व्यवस्था कशी करतां येईल, ही अडचण राष्ट्रकूट, यादव, वगैरे राज्यकर्त्यांना त्या त्या कालीं सहज च पडे. सदरील विवंचनेचें परिमार्जन त्या कालीं कसें व कितपत करतां आलें ह्या बाबीची स्फुटता पुढें करतों.

१०० चालुक्यादींच्या राजवटींत नागमाहाराष्ट्रिकोत्पन्न मराठ्यांची व्याप्ति महाराष्ट्रदेशांत सामान्य शेतकऱ्यां पासून तों पाटीलदेशमुखां पर्यंत झालेली होती. प्रथम जेव्हां माहाराष्ट्रिक दंडकारण्यांत व दक्षिणेंत वसाहती करूं लागले तेव्हां तर्फे तर्फेनें त्यांनीं गणराज्यें स्थापिलीं. गणराज्यांतील मुख्य जो ज्येष्ठराज त्याच्या कडे गणाचें पुढारपण असे व गणसंघांतील गण त्याचे अनुयायी असत. चालुक्यादि सम्राटांच्या अमदानींत ज्येष्ठराज देशमुख बनले व गणांतील गण पाटील व कुणबी बनले, आणि गणराज्यसंस्था लुप्त झाली. पाटील म्हणजे पट्टकील. पट्टकील ह्या सामासिक शब्दाचा अर्थ त्यांतील अवयवशब्दां वरून स्पष्ट आहे. अशोकादींच्या वेळीं कापसाचे विणलेले पट्ट लिहिण्या करितां वापरीत, जमीनीच्या मालकीची नोंद ह्या पट्टां वर करीत आणि ते पट्ट कीलकांत म्हणजे वेळूच्या पोकळ कांडांत घालून सुरक्षित ठेवीत. पट्टकील म्हणजे पट्ट ज्यांत ठेविले आहेत तीं वेळूचीं पोकळ कांडें. हे पट्टकील ज्याच्या ताब्यांत असत त्या गांवच्या ग्रामणीला पट्टकीलक म्हणत. पट्टकीलक या शब्दाचा अपभ्रंश पट्टकील. पट्टकील या शब्दाचा मराठी अपभ्रंश पाटैल, पाटेल, पाटील. तांब्याच्या पत्र्यां वर जमीनीच्या मालकीची नोंद करण्याची

